शिक्षणखात्याचा मंजुरी क्रमांक :

पापुमं/१०९५/१५३४०/७ - इतिहास [मराठी] स [पु], दि. १७.२.१९९५

# भारताचा इतिहास

## (मध्ययुग)

### इयत्ता सातवी

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,

पुणे.

प्रथमावृत्ती : जानेवारी, १९९५
पुनर्मुद्रण : जुलै, २००३



**इतिहास विषय समिती**
डॉ. अरविंद देशपांडे, अध्यक्ष
प्रा. अ. आ. पाटील, सदस्य
आब्बास इनामदार, सदस्य
डॉ. भास्कर भोळे, सदस्य
प्रा. जी. एम. पाटील, सदस्य
अरुण हळबे, सदस्य
आनंद हिवराळे, सदस्य
शकुंतला अ. अहिरे, सदस्य-सचिव

**लेखक**
डॉ. सुमित्रा कुलकर्णी
डॉ. ए. एम. सुतार
डॉ. अरुण जोशी

**संयोजन प्रमुख**
शकुंतला अ. अहिरे
विद्यासचिव, भाषेतर विषय,
पाठ्यपुस्तक मंडळ, पुणे.

**मुखपृष्ठ व सजावट**
चंद्रमोहन कुलकर्णी

**नकाशाकार**
गो. ना. कांबळे

**निर्मिती**
प्रमोद शिरोडकर
मुख्य निर्मिती अधिकारी
नितिन तांबे
निर्मिती अधिकारी

**फोटोटाईपसेटिंग**
स्वाती एन्टरप्राइजेस,
पुणे.

**कागद**
५८.५ x ८६ सेमी, ५७ जी.एस्.एम्.
क्रीमवोव्ह

**मुद्रणादेश**
एन/टेक/२००४-०५/२५

**मुद्रक**
आदर्श प्रिन्टर्स एण्ड पब्लिशर्स, भोपाल
संख्या : १५,००,०००

**प्रकाशक**
रमेश द. धर्माधिकारी
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती,
गोरेगाव, मुंबई - ४०० ०६२.

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी, म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण—१९८६' अनुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९८८' तयार करण्यात आला. या अभ्यासक्रमाची कार्यवाही १९८९-९० या शालेय वर्षापासून क्रमशः सुरू झाली आहे.

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार मंडळाने इतिहास विषयाचे इयत्ता सातवीचे प्रस्तुत पाठ्यपुस्तक तयार केले आहे. हे पाठ्यपुस्तक आपल्या हाती देताना आम्हाला आनंद वाटतो.

सर्व अध्ययन-अध्यापन प्रक्रिया विद्यार्थिकेंद्रित असावी; स्वयं-अध्ययनावर भर दिला जावा; प्राथमिक शिक्षणाच्या अखेरीस विद्यार्थ्यांनी अपेक्षित अध्ययन क्षमता प्राप्त कराव्यात; शिक्षणाची प्रक्रिया आनंददायी व्हावी, असा व्यापक दृष्टिकोन समोर ठेवून हे पुस्तक तयार केले आहे. 'स्वयं-अध्ययन' सुलभ व्हावे, म्हणून पुस्तकात प्रत्येक पाठावर स्वाध्याय दिले आहेत.

पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे, या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील निवडक शिक्षक तसेच काही शिक्षणतज्ज्ञ व विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले. आलेल्या सूचना व अभिप्राय यांचा काळजीपूर्वक विचार करून या पुस्तकाला अंतिम स्वरूप देण्यात आले आहे. इतिहास विषय समिती, लेखक आणि चित्रकार यांनी अतिशय आस्थेने हे पुस्तक तयार केले आहे. या पुस्तकाच्या लेखन-संपादनात निमंत्रित लेखक डॉ. एम. आर. कंटक यांचे समितीला बहुमोल सहकार्य लाभले आहे. मंडळ या सर्वांचे मनःपूर्वक आभारी आहे.

विद्यार्थी, शिक्षक व पालक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

अध्ययन व अध्यापन प्रभावी व्हावे, यासाठी या पुस्तकाची शिक्षक हस्तपुस्तिका मंडळाने प्रकाशित केली आहे. शिक्षक व पालक यांना ही हस्तपुस्तिका उपयुक्त ठरेल. शिक्षक हस्तपुस्तिकेचा त्यांनी जरूर उपयोग करावा.

सि आ देवकर

**(सि. आ. देवकर)**
संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

पुणे
दिनांक : १५ डिसेंबर, १९९४
२४ मार्गशीर्ष, शके १९१६

# अनुक्रमणिका



- मुखपृष्ठ : ग्वालियारचा किल्ला
- मलपृष्ठ : मुघलकालीन गालिचा
- आसपास : दिवाण-इ-खास, लाल किल्ला, दिल्ली

# १. भारत आणि जग

इतिहासाचे स्थूलमानाने तीन भाग पाडले जातात. प्राचीन, मध्ययुगीन व आधुनिक हे ते तीन भाग होत. हे भाग काळानुसार पाडले जातात. हे भाग पाडताना समाजात झालेल्या आर्थिक, राजकीय, प्रशासकीय, सामाजिक इत्यादी क्षेत्रांतील बदलांचाही विचार केला जातो. इतिहासाचे हे कालखंड मानवी प्रगतीचे विविध टप्पे आहेत. भारताच्या प्राचीन कालखंडाचा अभ्यास आपण मागील वर्षी केला आहे. या वर्षी आपण मध्ययुगीन भारताचा अभ्यास करणार आहोत.

भारताच्या मध्ययुगाची सुरुवात ढोबळमानाने इसवी सनाच्या नवव्या शतकाच्या सुमारास होते; आणि इसवी सनाच्या अठराव्या शतकाच्या अखेरीस मध्ययुग संपते. युरोपातील मध्ययुगाचा काळ इसवी सनाचे पाचवे शतक ते अठरावे शतक असा आहे. मध्ययुगात जगातील बहुतेक देशांत सर्वसामान्यपणे सारखीच परिस्थिती होती. विशेषत: राजकीय सत्तेचे स्वरूप व अर्थव्यवस्थेची रचना यांबाबतीत सर्वत्र बरेच साम्य होते.

**राजकीय सत्तेचे बदलते स्वरूप** : वर्धन व चालुक्य या प्राचीन व प्रबळ सत्तांचा ऱ्हास होऊन मध्ययुगाच्या सुरुवातीच्या सुमारे तीन शतकांत भारतात लहान-मोठ्या सत्तांचा उदय झाला. गुर्जर-प्रतिहार, परमार, राष्ट्रकूट, चोळ, पांड्य, होयसळ, यादव यांसारख्या प्रादेशिक सत्ता निर्माण झाल्या. नंतरच्या काळात भारतातील बराच मोठा प्रदेश सुलतानशाहीच्या अमलाखाली आला. सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धात मुघल सत्तेची स्थापना होऊन भारतात प्रबळ एकछत्री अंमल प्रस्थापित झाला.

युरोपमध्ये इसवी सनाच्या पाचव्या शतकापर्यंत रोमन साम्राज्याची सत्ता होती. इ. स. ४७६ मध्ये या साम्राज्याचा ऱ्हास झाल्यानंतर युरोपात ठिकठिकाणी प्रादेशिक सत्तांचा उदय होऊ लागला. पूर्व रोमन साम्राज्य म्हणून ओळखली जाणारी रोमन साम्राज्याची एक शाखा मात्र पंधराव्या शतकापर्यंत टिकून होती. कॉन्स्टँटिनोपल ही त्याची राजधानी होती. इसवी सनाच्या आठव्या शतकात पश्चिम आशियात अरबांचे साम्राज्य उदयाला आले.

**सामंतशाही** : मध्ययुगाच्या सुरुवातीस प्राचीन मध्यवर्ती सत्तांचा ऱ्हास होऊन

ठिकठिकाणी प्रादेशिक राजसत्ता उदयाला येऊ लागल्या. त्यांना लष्करी व अन्य सेवा पुरवण्याचे महत्त्वाचे काम सामंतांनी केले. या सेवेबद्दल राजांनी त्यांना जमिनी दिल्या. राजाचे नाममात्र सार्वभौमत्व मान्य करून हे सामंत आपापल्या प्रदेशात स्वतंत्रपणे राहू लागले. यातून एक नवी व्यवस्था अस्तित्वात आली. तिला 'सामंतशाही' असे नाव आहे. सामंतशाहीचा विकास हे मध्ययुगाचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

युरोपातील सामंत आपापल्या भूप्रदेशात तटबंदी असलेले वाडे बांधून राहत. या वाड्याला 'गढी' असे म्हणत. या गढ्यांमधून ते आपल्या प्रदेशाचे प्रशासन करत. या प्रदेशांतील शेतकरी व कष्टकरी लोक सामंतांच्या वर्चस्वाखाली असत.

गढी

कालांतराने त्यांच्या जमिनी सामंतांनी बळकावल्या. त्यामुळे अनेक शेतकरी भूदास झाले. या शेतकरी-भूदासांची स्थिती हलाखीची होती. त्यांना कोणत्याही प्रकारचे स्वातंत्र्य नसे. सामंतांच्या गढीवर त्यांना विनावेतन काम करावे लागे. प्रसंगी सामंतांच्या पायदळात सैनिक म्हणून लढावे लागे.

प्रजेचे रक्षण करणे, आपल्या प्रदेशात शांतता व सुव्यवस्था राखणे, राजाच्या

वतीने न्यायदानाचे काम करणे, प्रशासकीय कामात सहभागी होणे, युद्धकाळात राजाला लष्करी व अन्य मदत करणे अशी अनेक कामे हे सामंत करत.

भारतातील सामंतशाहीचे स्वरूप वेगळे होते. भारतातील सामंत हे युरोपातील सामंतांएवढे स्वतंत्र नव्हते. ते राजसत्तेच्या नियंत्रणाखाली होते. भारतात सामंतशाही व्यवस्था अस्तित्वात आली तरी येथील शेतकऱ्यांचे जमिनीचे मालकी हक्क अबाधित राहिले. युरोपप्रमाणे भूदासांचा वर्ग भारतात निर्माण झाला नाही.

**युरोपात व्यापारी वर्गाचा उदय** : मध्ययुगात युरोपचा व्यापार वाढून व्यापारविषयक विविध कामे करणारा व्यापारी वर्ग उदयास आला. व्यापारासाठी युरोपीय व्यापारी दूरवर जाऊ लागले. अनेक देशांशी, अनेक संस्कृतीशी त्यांचा संबंध येऊ लागला. व्यापारामुळे नवीन नगरे निर्माण झाली.

**अरबांचा उदय** : अरब हे पश्चिम आशियातील अरबस्तानचे रहिवासी. प्राचीन काळात ते टोळ्याटोळ्यांनी राहत असत. या टोळ्यांच्या परस्परांतील संघर्षामुळे अरबस्तान नेहमीच अशांत प्रदेश होता.

इसवी सनाच्या सातव्या शतकात अरबांच्या जीवनाला मूलगामी कलाटणी मिळाली. हजरत मुहम्मद पैगंबर यांनी उपदेशिलेला इस्लाम धर्म अरबांनी स्वीकारला. पैगंबरांच्या नेतृत्वाखाली अरब एकत्र आले. पैगंबरांचे वारसदार म्हणजे खलिफा. खलिफांच्या काळात अरबांची सत्ता वृद्धिंगत झाली. स्पेनपासून भारताच्या पश्चिम सीमेपर्यंत त्यांचे साम्राज्य पसरले.

कला, विज्ञान, साहित्य या क्षेत्रांत मध्ययुगीन अरबांनी लक्षणीय कामगिरी केली. पौर्वात्य, विशेषत: भारतातील ,प्राचीन ज्ञान त्यांनी जतन करून ठेवले व त्यात भरही घातली. प्राचीन ग्रीक व प्राचीन भारतीय वैज्ञानिक ग्रंथांची त्यांनी अरबीमध्ये भाषांतरे केली. खगोलशास्त्र व गणितविषयक भारतीय कल्पना अरब लोकांमुळे पाश्चात्त्य जगाला परिचित झाल्या. शिक्षण क्षेत्रातही अरबांनी महत्त्वाची कामगिरी केली. कार्डोवा आणि कैरो यांसारख्या विद्यापीठांची स्थापना केली. बगदाद हे त्यांचे राजधानीचे शहर जगातील एक प्रमुख सांस्कृतिक केंद्र बनले.

साम्राज्याचा विस्तार करण्यासाठी अरब सत्ताधीश भारताकडे वळले. इ. स. ७१२ मध्ये मुहम्मद बिन कासीम या अरब सेनानीने सिंध प्रांतावर स्वारी

केली व तेथील दाहीर या राजाचा पराभव केला. सिंध व मुलतान हे प्रदेश अरबांच्या आधिपत्याखाली आले.

**भारत आणि जग :** प्राचीन भारत आणि पश्चिमेकडील देश यांच्यातील व्यापारामध्ये अरब लोकांनी महत्त्वाची भूमिका पार पाडली. व्यापाराच्या माध्यमातून अरबांचा भारताशी पूर्वीपासूनच संबंध आलेला होता. आठव्या शतकात झालेल्या मुहम्मद बिन कासीमच्या स्वारीमुळे भारत आणि अरब यांचा राजकीय संबंध प्रथमच आला. त्यापुढील काळात मध्य आशियातील तुर्क, अफगाण, मुघल हे सत्ताधीश भारतात आले व त्यांनी भारतात आपली सत्ता स्थापन केली. इसवी सनाच्या पंधराव्या शतकाच्या शेवटी युरोपातून पोर्तुगीज भारतात आले. त्यांनी भारतात आपली सत्ता स्थापन केली. पुढे अठराव्या शतकात इंग्रज व फ्रेंच यांनीही भारतात सत्ता प्रस्थापित केल्या.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :
   (अ) भारताच्या इतिहासातील मध्ययुगाचा काळ कोणता ?
   (आ) मध्ययुगीन भारतात कोणत्या लहान-मोठ्या सत्ता उदयास आल्या ?
   (इ) सामंतांचे प्रमुख काम कोणते ?

२. रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा :
   (अ) भारतात सामंतशाहीच्या काळात शेतकऱ्यांच्या ----------- हक्कावर गदा आली नाही.
   (आ) इ. स. ७१२ मध्ये मुहम्मद बिन कासीम या अरब सेनानीने ----------- प्रांतावर स्वारी केली.
   (इ) भारत आणि अरब यांचा ----------- संबंध मध्ययुगातच प्रथम आला.

३. पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यांत उत्तरे द्या :
   (अ) मध्ययुगाची वैशिष्ट्ये लिहा.
   (आ) विज्ञान व शिक्षण या क्षेत्रांतील अरबांची कामगिरी लिहा.

● ● ●

# २. लहान-मोठ्या सत्तांचा उदयास्त
## इ. स. ८०० ते १२००

मध्ययुगाच्या सुरुवातीस भारतात अनेक लहान-मोठ्या सत्ता उदयाला आल्या. त्यांनी भारताच्या इतिहासात मोलाची कामगिरी बजावली आहे. या पाठात आपण या सत्तांची ओळख करून घेणार आहोत.

**पांड्य :** तमिळनाडूमधील तिन्नेवेलीच्या प्रदेशात पांड्य सत्ता प्राचीन काळापासूनच अस्तित्वात होती. त्या सत्तेला इसवी सनाच्या आठव्या शतकात अरिकेसरी मारवर्मा याने प्रबळ बनवले. नवव्या शतकात चोळ सत्तेचा उदय झाल्यानंतर पांड्य व चोळ यांच्यात संघर्ष झाले व पांड्य सत्तेला उतरती कळा लागली. बाराव्या शतकात जटावर्मन कुलशेखर याने पांड्य सत्ता पुन्हा सामर्थ्यवान केली. त्याच्यानंतर सत्तेवर आलेला सुंदर पांड्य (इ. स. १२१६ — १२३८) याने तंजावर हे चोळांचे ठिकाण जिंकून घेतले. पुढे वीर पांड्य जटावर्मन याने श्रीलंकेवर स्वारी केली. होयसळ सत्तेचाही त्याने श्रीरंगमच्या लढाईत पराभव केला. चौदाव्या शतकात दिल्लीचा सुलतान अल्लाउद्दीन खल्जी याचा सेनापती मलिक काफूर याने पांड्य सत्ता सुलतानाच्या वर्चस्वाखाली आणली.

पांड्य सत्तेच्या काळात मंदिरस्थापत्य कलेत प्रगती झाली. मुख्य मंदिराला जोडून मंडप बांधण्याची प्रथा या काळात रूढ झाली.

**पाल** : आठव्या शतकात बंगालमध्ये पाल सत्तेचा उदय झाला. गोपाल हा या सत्तेचा संस्थापक होय. त्याचा पुत्र धर्मपाल याने मगधवर आपली सत्ता स्थापन केली. त्याला राष्ट्रकूट व प्रतिहार सत्तांशी बराच काळ संघर्ष करावा लागला. या संघर्षात तो यशस्वी झाला. त्याने उत्तर भारतात पाल सत्तेचा विस्तार केला. त्याच्यानंतर पालांची सत्ता सुमारे चारशे वर्षे बंगालमध्ये अस्तित्वात होती. या काळात पालांनी आग्नेय आशियाशी व्यापारी व सांस्कृतिक संबंध जोडले.

पाल राजे बौद्ध धर्माचे अनुयायी होते. त्यांनी नालंदा, विक्रमशीला इत्यादी ठिकाणी विहार बांधले; त्याचप्रमाणे वेदविद्येलाही प्रोत्साहन दिले.

**राष्ट्रकूट :** इसवी सनाच्या आठव्या शतकात दक्षिण भारतात राष्ट्रकूट सत्ता उदयाला आली. इ. स. ७९२ मध्ये गादीवर आलेला तिसरा गोविंद या राजाच्या

कारकिर्दीत राष्ट्रकूट सत्ता कनोजपासून रामेश्वरपर्यंत पसरली. त्याचा मुलगा अमोघवर्ष याने सोलापूरजवळ मालखेड हे नवे नगर वसवले व आपली राजधानी तेथे नेली. अमोघवर्षानंतरचा पराक्रमी राजा तिसरा कृष्ण हा होय. राष्ट्रकूट सत्तेला चोळ राजांनी दिलेले आव्हान त्याने मोडून काढले. त्याचप्रमाणे अलाहाबादपर्यंतचा प्रदेश त्याने जिंकून घेतला व राष्ट्रकूट सत्ता उत्तर भारतातही वाढवली. दहाव्या शतकात राष्ट्रकूट सत्तेला उतरती कळा लागली. चालुक्य राजा तैल याने राष्ट्रकूटांचा पराभव केला.

राष्ट्रकूट राजे कार्यक्षम प्रशासक होते. त्यांच्या काळात व्यापार व उद्योगधंदे यांची वाढ झाली. वेरूळ येथील जैन लेणी, कैलास मंदिर तसेच कन्याकुमारीजवळील मंदिरे अशा कितीतरी वास्तू राष्ट्रकूटांच्या काळात निर्माण झाल्या.

**चोळ** : तमिळनाडूमधील चोळ सत्ता ही मध्ययुगातील एक प्रबळ सत्ता होती. इ. स. ८५० च्या सुमारास विजयालय या राजाने तंजावर जिंकून घेतले व दक्षिण भारताच्या राजकारणात चोळांचे महत्त्व प्रस्थापित केले. विजयालय याचा नातू परांतक याने चोळांची सत्ता बलशाली करून ती कन्याकुमारीपर्यंत वाढवली. त्याने शेतीसाठी जलसिंचनाच्या विविध योजना अमलात आणल्या.

इ. स. ९८५ मध्ये गादीवर आलेला पहिला राजराज हा चोळ घराण्यातील महापराक्रमी राजा होय. त्याने पांड्य, चालुक्य आणि केरळाधिपती या सत्तांचा पराभव केला. त्याचप्रमाणे त्याने प्रबळ सैन्य आणि प्रभावी नौदल यांच्या जोरावर उत्तर श्रीलंका व मालदीव बेटे जिंकून घेतली.

राजराज याचा पुत्र राजेंद्र हा इ. स. १०१३ मध्ये गादीवर आला. त्याने चालुक्यांचा अनेक वेळा पराभव केला. राजेंद्राने कलिंग, दक्षिण कोसल, उडीसा हे प्रदेश जिंकून घेतले. इ. स. १०२५ मध्ये त्याने आग्नेय आशियातील जावा व सुमात्रा बेटांवर नाविक हल्ला केला व तेथे आपले प्रभुत्व प्रस्थापित केले; त्याचप्रमाणे मलायातील शैलेंद्रांचे राज्यही जिंकून घेतले. राजेंद्रानंतर मात्र चोळ घराण्यात कर्तबगार राजे झाले नाहीत. पुढे इ. स. १३१० मध्ये मलिक काफूर याने चोळांचे राज्य नष्ट केले.

चोळ राजे प्रजाहितदक्ष होते. शेती व उद्योगधंदे यांकडे त्यांनी लक्ष पुरवले. त्यांच्या कारकिर्दीत अंतर्गत व आंतरराष्ट्रीय व्यापार भरभराटीला आला. चोळ

**नटराज : ब्राँझ शिल्प (बारावे शतक)**

राजवटीत वास्तुकलेची व विशेषत: धातुशिल्पकलेची उल्लेखनीय प्रगती झाली. या काळातील नटराजाच्या ब्राँझच्या मूर्ती प्रसिद्ध आहेत.

**गुर्जर-प्रतिहार** : इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या पूर्वार्धात मध्य भारतात गुर्जर-प्रतिहार सत्तेचा उदय झाला. वत्सराज हा गुर्जर-प्रतिहारांचा एक महत्त्वाचा राजा होय. त्याने पश्चिम व उत्तर भारतातील बराचसा प्रदेश जिंकून घेतला. त्याचा मुलगा दुसरा नागभट याने आंध्र, कलिंग, विदर्भ, पश्चिम काठेवाड तसेच कनोज या प्रदेशांवर आपली सत्ता प्रस्थापित केली. नागभटाचा नातू भोज याच्या काळात प्रतिहारांची सत्ता कळसास पोहोचली. त्याने राष्ट्रकूट राजा दुसरा कृष्ण याचा पराभव करून गुजरातवर आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याचप्रमाणे त्याने सिंधमधील अरबांच्या सत्ताविस्ताराला पायबंद घातला.

इ. स. ९१५ च्या सुमारास राष्ट्रकूट राजा इंद्र याने गुर्जर-प्रतिहारांचा पराभव केला. त्यानंतर या सत्तेस उतरती कळा लागली.

**राजपूत** : दहाव्या शतकात ज्या स्वतंत्र राजपूत राज्यांना महत्त्व प्राप्त झाले त्यांमध्ये परमार, चंदेल्ल आणि चौहान यांची राज्ये प्रमुख होती. मध्य भारतात

माळव्यावर परमारांचे राज्य होते. इ. स. १००० मध्ये भोज हा राजा गादीवर आला. भोज राजाने परमारांची सत्ता दक्षिणेत कोकणपर्यंत वाढवली. भोज राजा, त्याच्या पराक्रमाबद्दल, तसेच विद्वत्ता व गुणग्राहकता यांसाठी प्रसिद्ध आहे. बाराव्या शतकात विंध्यवर्मन या परमार राजाला होयसळ आणि यादव यांच्या आक्रमणांना तोंड द्यावे लागले. तेराव्या शतकात परमार व चौहान यांच्यात अनेक संघर्ष झाले. रणथंभोरचा राजा हमीर, देवगिरीचा राजा रामदेवराव यादव आणि दिल्लीचा सुलतान जलालुद्दीन खल्जी यांनी परमारांच्या राज्यावर स्वाऱ्या केल्या. इ. स. १३०५ मध्ये अल्लाउद्दिनाने माळवा जिंकला आणि परमारांची सत्ता संपुष्टात आली.

इसवी सनाच्या दहाव्या शतकात बुंदेलखंडात चंदेल्लांनी आपली स्वतंत्र सत्ता स्थापन केली. यशोवर्मा या राजाने चंदेल्ल सत्ता यमुना नदीपर्यंत वाढवली. गझनीच्या महमुदाने चंदेल्ल राज्यावर केलेल्या स्वाऱ्या राजा विद्याधर याने परतवून लावल्या. तेराव्या शतकाच्या सुरुवातीला कुतुबुद्दीन ऐबक आणि चौदाव्या शतकाच्या सुरुवातीस अल्लाउद्दीन खल्जी यांनी चंदेल्लांचा बराचसा प्रदेश काबीज केला व चंदेल्ल सत्ता नष्ट झाली.

खजुराहो येथील सुप्रसिद्ध मंदिरे चंदेल्ल राजवटीत बांधली गेली.

राजस्थानच्या उत्तरेकडील प्रदेशात चौहानांचे राज्य होते. पृथ्वीराज चौहान हा या घराण्यातील पराक्रमी राजा होता. त्याच्या काळात मुहम्मद घुरीने भारतावर स्वारी केली. पृथ्वीराजाने तराईच्या पहिल्या युद्धात त्याचा पराभव केला. परंतु इ. स. ११९२ च्या तराईच्या दुसऱ्या युद्धात मुहम्मद घुरीने पृथ्वीराजाचा पराभव केला आणि चौहानांची सत्ता संपुष्टात आली.

**यादव** : नाशिक जिल्ह्यातील चांदवड हे यादवांचे मुख्य ठिकाण होते. बाराव्या शतकात भिल्लम याने यादवांचे स्वतंत्र राज्य स्थापन केले. भिल्लमाने देवगिरी हे नवे शहर वसवले आणि तेथे राजधानी स्थापन केली.

भिल्लमाने यादवांच्या राज्याची दक्षिण सीमा कृष्णा नदीपलीकडे वाढवली. त्याने चालुक्य, होयसळ व चोळ या सत्तांचा पराभव केला. उत्तरेस नागपूरपलीकडील काही प्रदेशही त्याने जिंकून घेतला. भिल्लमानंतर सिंघण, कृष्णदेव व रामदेव यांसारखे कर्तबगार राजे देवगिरीच्या गादीवर आले. कृष्णा व मलप्रभा नद्यांमधील

प्रदेश होयसळांकडून सिंघण यादवाने जिंकून घेतला. माळव्याचे परमार, कोल्हापूरचे शिलाहार इत्यादींना पराभूत करून सिंघणाने वऱ्हाड, खानदेश, बीड, परभणी, कोल्हापूर, रत्नागिरी व उत्तर म्हैसूर इतका मोठा प्रदेश आपल्या राज्यास जोडला.

सिंघणानंतरचा यादव राजा कृष्णदेव याचा सेनापती चामुंडराय याने कावेरी नदीपर्यंतचा प्रदेश जिंकून तो यादवांच्या राज्याला जोडला.

तेराव्या शतकात अल्लाउद्दीन खल्जी याने देवगिरीवर स्वारी करून रामदेवराव यादवाचा पराभव केला आणि यादवांची सार्वभौम सत्ता नष्ट झाली.

यादवांची सत्ता जवळजवळ सर्व महाराष्ट्रभर पसरली होती. यादवांच्या काळात मराठी संस्कृती बहरू लागली. श्री चक्रधरस्वामी व संत ज्ञानेश्वर हे थोर संत कवी याच काळात होऊन गेले. महाराष्ट्रात वारकरी संप्रदायाची पायाभरणीही या काळात झाली.

**होयसळ** : नृपकाम याने इ. स. १०२२ च्या सुमारास होयसळांचे राज्य स्थापन केले. इ. स. १११० मध्ये सत्तेवर आलेल्या विष्णुवर्धन या होयसळ राजाने संपूर्ण कर्नाटक आपल्या आधिपत्याखाली आणला. कर्नाटकच्या उत्तरेसही त्याने आपला प्रभाव वाढवला. विष्णुवर्धनाने होयसळांची राजधानी बेलूर येथून द्वारसमुद्र (हळेबीड) येथे नेली. त्याच्या कारकिर्दीत बेलूर व हळेबीड येथे सौंदर्यपूर्ण मंदिरे बांधण्यात आली.

तेराव्या शतकात होयसळांच्या सत्तेला ओहोटी लागली. इ. स. १३१० मध्ये मलिक काफूर याने वीर बल्लाळ या राजाचा पराभव केला आणि होयसळ सत्तेचा अस्त झाला.

इ. स. ८०० ते १२०० या काळात उदयास आलेल्या या विविध प्रादेशिक राजसत्तांनी आपापल्या प्रदेशातील लोकांच्या कल्याणाकडे लक्ष पुरवले. विद्यांना व कलांना त्यांनी प्रोत्साहन दिले. व्यापारालाही उत्तेजन दिले.

या काळात भारतीय संस्कृती आग्नेय आशियापर्यंत जाऊन पोहोचली. मात्र या सत्तांचे आपापसांत सतत संघर्ष होत राहिले. भारतातील या अस्थिरतेचा फायदा वायव्य सीमेपलीकडील तुर्की सत्ताधीशांनी घेण्यास सुरुवात केली.

**यादवकालीन सुवर्ण नाणे**

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :
   (अ) चोळ राजा पहिला राजराज याने कोणते प्रदेश जिंकून घेतले ?
   (आ) राष्ट्रकूटांच्या काळातील दोन वास्तूंची नावे लिहा.
   (इ) राजपुतांच्या प्रमुख राज्यांची नावे सांगा.
   (ई) भिल्लम यादवाने कोणकोणत्या सत्तांचा पराभव केला ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :
   (अ) वेरूळ येथील जैन लेणी ------------- काळात खोदली गेली.
   (पांड्यांच्या, राष्ट्रकूटांच्या, चोळांच्या)
   (आ) पृथ्वीराज चौहान याने तराईच्या पहिल्या युद्धात -------- याचा पराभव केला.
   (महमूद गझनी, मुहम्मद घुरी, कुतुबुद्दीन ऐबक)
   (इ) मराठी संस्कृती ------------ राजवटीत बहरास आली.
   (राष्ट्रकूटांच्या, शिलाहारांच्या, यादवांच्या)
   (ई) होयसळ राजा विष्णुवर्धन याच्या कारकिर्दीत बेलूर व ---------- येथे सौंदर्यपूर्ण मंदिरे बांधण्यात आली.
   (खजुराहो, हळेबीड, देवगिरी)

३. पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यांत उत्तरे द्या :
   (अ) पाल राजांनी सांस्कृतिक क्षेत्रात कोणती कामगिरी केली ?
   (आ) चोळ सत्तेचा विस्तार कसा झाला ते सांगा.
   (इ) विष्णुवर्धन या होयसळ राजाच्या कामगिरीची माहिती लिहा.

४. पुढे वास्तूंची नावे दिली आहेत. त्या वास्तू कोणत्या सत्तेच्या काळातील आहेत ते लिहा :
   (अ) वेरूळ येथील कैलास मंदिर -------------
   (आ) खजुराहो येथील मंदिरे -------------
   (इ) नालंदा, विक्रमशीला येथील विहार -------------

५. उपक्रम :
   वेरूळच्या कैलास मंदिराचे चित्र मिळवा. त्या मंदिराच्या रचनेत तुम्हांला आढळणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी नोंदवा.

● ● ●

# ३. आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक जीवन
## इ. स. ८०० ते १२००

इ. स. ८०० ते १२०० या चारशे वर्षांच्या कालखंडात भारतात झालेल्या आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक घडामोडीचा अभ्यास आपण या पाठात करणार आहोत.

**व्यापाराची वाढ** : मध्ययुगाच्या सुरुवातीच्या दोन शतकांत भारताचा व्यापार मंदावला होता. दहाव्या शतकानंतर मात्र व्यापारास चालना मिळाली. अरब साम्राज्याच्या स्थापनेनंतर भारतातील कापड, सुगंधी द्रव्ये व मसाल्याचे पदार्थ यांना अरबांकडून मोठी मागणी सुरू झाली. चीनमध्येही मसाल्याच्या पदार्थांना तसेच हस्तिदंत, काचेचे सामान, औषधी द्रव्ये, लाख इत्यादी पदार्थांना मोठी मागणी होती. चोळ राजांनी चीनबरोबरच्या व्यापाराला प्रोत्साहन दिले. इ. स. १०७७ मध्ये चोळांनी एक व्यापारी शिष्टमंडळ चीनला पाठवले. पाल सत्तेनेही व्यापाराला चालना दिली. ताम्रलिप्ती बंदर पुन्हा एकदा व्यापारामुळे गजबजू लागले.

**व्यापारी व कारागिरांच्या श्रेणी** : व्यापारवृद्धीमुळे, पूर्वांपार चालत आलेल्या व्यापाऱ्यांच्या श्रेणींचा या काळात विकास झाला. व्यापाऱ्यांना आर्थिक साहाय्य करणे, मालाची ने-आण करण्यात मदत करणे, वाहतुकीची व्यवस्था करणे, व्यापारी मालाच्या संरक्षणाची सोय करणे अशी अनेक कामे व्यापाऱ्यांच्या श्रेणींमार्फत केली जात.

विणकाम, कुंभारकाम, बागकाम इत्यादी कामे करणाऱ्या कारागिरांच्याही श्रेणी होत्या. विविध वस्तूंचे दर्जेदार उत्पादन व वितरण करणे, कारागिरांना भांडवल पुरवणे, व्यावसायिक प्रशिक्षण देणे इत्यादी कामे या श्रेणी करत.

**नगरांचा विकास** : नव्याने उदयाला आलेल्या राजसत्तांमुळे तसेच व्यापारवृद्धी-मुळे या काळात नगरांचा विकास झाला. मालखेड, उज्जैन, चंपानेर इत्यादी नगरे भरभराटीस आली.

सरदार, उमराव, व्यापारी, प्रशासक वर्ग व सेवा-चाकरी करणारे लोक नगरांमध्ये राहत. या काळात ग्रामजीवनात फारसे बदल झाले नाहीत. बहुतांश लोक खेड्यांत राहत. खेड्यांतील लोकांचा मुख्य व्यवसाय शेती हा होता. कुंभारकाम, लोहारकाम,

सुतारकाम इत्यादी व्यवसाय करणारे लोकही खेड्यांत असत.

**सामाजिक स्थिती** : या काळात जातिसंस्था व स्त्रियांचा सामाजिक दर्जा यांमध्ये बदल झाले नाहीत. भारतीय समाज परंपरानिष्ठच राहिला. समाज जाती-उपजातींमध्ये विभागलेला होता. जाती-जातींमधील संबंध हे रूढी, परंपरांनी ठरवल्याप्रमाणेच होत असत. जातीबाहेर लग्न करण्यास बंदी होती, तसेच जातीबाहेरील व्यक्तीबरोबर खाणे-पिणे निषिद्ध मानले जाई. या काळात निर्माण झालेले नवे उद्योगधंदे करणाऱ्या लोकांच्या नव्या जाती-उपजाती उदयाला आल्या. प्राचीन काळात रूढ झालेली अस्पृश्यतेची प्रथा या काळात आणखीच कडक झाली. अस्पृश्यतेचा हा कलंक दूर करण्याचे प्रयत्न दीर्घ काळ झाले नाहीत. जाती-जातींमधील कडक निर्बंधांमुळे विचारांची देवाण-घेवाण बंद झाली. व्यवसाय हे जातिनिहाय होते. कृषी, अभियांत्रिकी किंवा तांत्रिक व्यवसाय करणाऱ्यांना कमी दर्जाचे मानले जाई. त्यांना विद्यार्जनाचा अधिकार नव्हता. त्यामुळे शिक्षण व प्रत्यक्ष अनुभव यांची फारकत झाली आणि वैज्ञानिक प्रगती खुंटली.

**प्रार्थनास्थळांचे वाढते सामाजिक महत्त्व** : या काळात समाजजीवनात प्रार्थना-स्थळांना विशेष महत्त्व प्राप्त होऊ लागले. प्रार्थनास्थळी लोक एकत्र येत. उत्सवप्रसंगी जत्रा भरत. जत्रांच्या निमित्ताने लोक एकमेकांच्या गावी जा-ये करू लागले. गायन-वादन, नृत्य, मूर्तिकला त्याचप्रमाणे स्थापत्य इत्यादी कला मंदिरांच्या आवारात शिकवल्या जात. मंदिरांमुळे या कलांच्या विकासाला चालना मिळाली. काही ठिकाणी मंदिरांतून शाळा तसेच गावाच्या पंचायतीही भरत असत.

**विविध कलांचा विकास** : मूर्तिकला, लघुचित्रे व विशेषत: मंदिरस्थापत्य या कलांची या काळात उल्लेखनीय प्रगती झाली.

**मूर्तिकला** : मंदिरांच्या दगडी भिंतींवर मूर्ती कोरलेल्या असत, तसेच स्वतंत्रपणेही पाषाणांत मूर्ती कोरल्या जात. गौतमबुद्ध, पौराणिक देवदेवता, जैन तीर्थंकर इत्यादींच्या अनेक मूर्ती घडवल्या गेल्या. म्हैसूरजवळील श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराची रेखीव व प्रमाणबद्ध मूर्ती ही एक अद्वितीय कलाकृती आहे.

**लघुचित्रे** : हस्तलिखित ग्रंथ सुशोभित करण्यासाठी त्यात लहान आकाराची चित्रे काढण्यात येऊ लागली. असे बौद्ध व जैन साहित्यातील काही तत्कालीन

लघुचित्रशैली

ग्रंथ आजही उपलब्ध आहेत. पाल राजांच्या काळात अशी लघुचित्रे मोठ्या प्रमाणावर काढली गेली.

अबू येथील दिलवाडा मंदिरातील कोरीव काम

**मंदिरस्थापत्य** : या काळात मंदिरस्थापत्यकला विकसित झाली. भारताच्या विविध भागांत अनेक मंदिरे बांधली गेली. भव्यता, नाजूक व रेखीव शिल्पकाम, कोरीव काम, उंच शिखरे, गोपुरे व विस्तृत आवार ही या काळातील मंदिर-स्थापत्याची वैशिष्ट्ये आहेत.

राजस्थानमधील अबूच्या पहाडात दिलवाडा येथे बांधलेली जैन मंदिरे त्यांतील संगमरवरावरील कोरीव कामासाठी प्रसिद्ध आहेत.

**होयसळेश्वर मंदिर : हळेबीड**

हळेबीड येथील होयसळकालीन मंदिरांच्या भिंती छतापासून पायापर्यंत कोरीव कामाने सजवलेल्या आहेत. या कोरीव कामातील कौशल्य अजोड आहे.

मध्यभारतातील खजुराहो येथे शिव व विष्णू यांची, तसेच जैन तीर्थंकरांची मंदिरे आहेत. त्यांपैकी कंडारीय महादेव मंदिर विशेष प्रसिद्‌ध आहे. त्यावरील शिल्पकाम अत्यंत डौलदार आहे. भुवनेश्वर येथील लिंगराज मंदिरही सुप्रसिद्‌ध आहे.

**लिंगराज मंदिर : भुवनेश्वर**

**कंडारीय महादेव मंदिर : खजुराहो**

**प्रादेशिक भाषांतील वाङ्मय :** या काळात विविध संस्कृत ग्रंथ लिहिले गेले. त्यांपैकी सोमदेवाचा 'कथासरित्सागर', जयदेवाचा 'गीतगोविंद' व कल्हणाचा 'राजतरंगिणी' हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. या काळात अपभ्रंश भाषेतही साहित्यनिर्मिती होऊ लागली. 'पऊमचरिउ', 'महापुराण' हे अपभ्रंश भाषेतील ग्रंथ याच काळातील होत. 'पेरियपुराणम' हा तमिळ भाषेतील काव्यग्रंथ, 'कविराज मार्ग' हा कन्नड भाषेतील ग्रंथ हे या काळात लिहिले गेले. 'दोहा' हा काव्यप्रकार वापरात आला. याच काळात मराठी, गुजराती, बंगाली इत्यादी प्रादेशिक भाषांचा उदय झाला.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या:

(अ) व्यापाऱ्यांच्या श्रेणींचा विकास का झाला ?

(आ) अरबांकडून कोणत्या भारतीय मालाला मागणी येऊ लागली ?

(इ) नवीन नगरांचा विकास कशामुळे झाला ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) लघुचित्रे ------------- राजांच्या काळात मोठ्या प्रमाणावर काढली गेली.
(चोळ, पांड्य, पाल)

(आ) हळेबीड येथील ------------- कालीन मंदिरांच्या भिंतींवर छतापासून पायापर्यंत कोरीव काम केलेले आहे.
(चालुक्य, होयसळ, चोळ)

(इ) मध्ययुगात मराठी, गुजराती, बंगाली या ------------- भाषांचा उदय झाला.
(अपभ्रंश, प्राकृत, प्रादेशिक)

३. योग्य त्या जोड्या लावा :

| ग्रंथ | ग्रंथकार |
|---|---|
| (अ) कथासरित्सागर | (१) कल्हण |
| (आ) गीतगोविंद | (२) सोमदेव |
| (इ) राजतरंगिणी | (३) जयदेव |
| | (४) वामदेव |

४. इ. स. ८०० ते १२०० या काळातील पुढील गोष्टींची माहिती सांगा :

(अ) सामाजिक स्थिती

(आ) मंदिरस्थापत्य

(इ) व्यापारी श्रेणींची कामे

५. उपक्रम :

पुढे दिलेल्या मंदिरांची / शिल्पाची चित्रे मिळवा व त्यांतील कलाकुसरीची माहिती वहीत लिहा.

(१) दिलवाडा जैन मंदिरे

(२) गोमटेश्वर

● ● ●

# ४. सुलतानशाही
## स्थापना, विस्तार आणि ऱ्हास

इसवी सनाच्या अकराव्या शतकाच्या सुरुवातीपासून भारतावर वायव्येकडून तुर्क लोकांची आक्रमणे होऊ लागली. तुर्क हे मध्य आशियाचे रहिवासी होत. मध्य आशियात तुर्कांच्या अनेक सत्ता उदयास आल्या. त्यांनी आपल्या प्रदेशांचा विस्तार करण्यास सुरुवात केली. त्यांची सत्ता भारताच्या वायव्य सरहद्दीपर्यंत येऊन ठेपली. गझनीचा तुर्क सत्ताधीश सबक्तगीन याने भारतावर स्वाऱ्या करून पंजाबमधील बियास नदीपर्यंतचा प्रदेश जिंकून घेतला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा महमूद हा इ. स. ९९८ मध्ये गझनीचा सुलतान झाला.

**गझनीचा महमूद** : गझनीच्या महमुदाने इ. स. १००१ ते १०२७ या काळात भारतावर सतरा स्वाऱ्या केल्या. भारतातून संपत्ती मिळवणे हा त्याचा मुख्य हेतू होता. मथुरा, सोमनाथ इत्यादी ठिकाणची संपन्न मंदिरे लुटून त्याने प्रचंड संपत्ती आपल्याबरोबर नेली.

**मुहम्मद घुरी** : महमुदाच्या स्वाऱ्यांनंतर जवळजवळ दीडशे वर्षांनी, इ. स. ११९१ मध्ये मुहम्मद घुरी याने भारतावर आक्रमण केले. मुहम्मद घुरी हा अफगाणिस्तानातील एक सुलतान होता. त्याने भारतातील सिंध, मुलतान व पंजाब हे प्रदेश जिंकून घेतले. दिल्ली येथे पृथ्वीराज चौहान राज्य करत होता. मुहम्मद घुरीने इ. स. ११९२ मध्ये त्याचा पराभव करून दिल्ली काबीज केली. कनोजचा राजा जयचंद याचा पराभव करून तो प्रदेश घुरीने आपल्या आधिपत्याखाली आणला. पुढे त्याने बिहार व बंगाल हे प्रदेशही जिंकून घेतले.

आपल्या आधिपत्याखालील या विस्तृत प्रदेशावर नियंत्रण ठेवण्यासाठी त्याने आपला विश्वासू सरदार कुतुबुद्दीन ऐबक याची नियुक्ती केली. इ. स. १२०६ मध्ये मुहम्मद घुरीचा मृत्यू झाला. त्या वेळी पेशावरपासून बंगालपर्यंतचा प्रदेश ऐबकाच्या नियंत्रणाखाली होता. मुहम्मद घुरीच्या मृत्यूनंतर ऐबकाने आपले स्वातंत्र्य घोषित केले आणि दिल्लीच्या सुलतानशाहीची स्थापना केली.

**कुतुबुद्दीन ऐबक** : इ. स. १२०६ ते १२१० या चार वर्षांच्या आपल्या कारकिर्दीत कुतुबुद्दीन ऐबकाला अंतर्गत विरोधाला व बंडाळ्यांना तोंड द्यावे लागले. राजपूत राजे व तुर्की सरदारांचा त्याला विरोध होता. ऐबकाने बंगालमधील

विरोधकांचा उठाव मोडून काढला. आपल्या राज्याला स्थैर्य प्राप्त करून देण्यापूर्वीच ऐबकाचा मृत्यू झाला. कुतुबुद्दीन न्यायी व कुशल राज्यकर्ता होता. त्याच्या काळात दिल्ली येथे कुतुबमिनार बांधण्यास प्रारंभ झाला.

**अल्तमश** : कुतुबुद्दीन ऐबकानंतर अल्तमश हा दिल्लीच्या गादीवर आला. सिंधच्या सुभेदाराचे बंड त्याने मोडून काढले. त्याचप्रमाणे अजमेर, ग्वालियार इत्यादी ठिकाणच्या राजपूत राजांचा पराभव केला. अल्तमशाने चलनव्यवस्थेत सुधारणा करून टंका हे चांदीचे नाणे प्रचारात आणले. त्याला कलेची आवड होती. दिल्ली

**सुलतान अल्तमशाचे चांदीचे नाणे : टंका**

येथील कुतुबमिनाराचे बांधकाम त्याने पूर्ण केले. त्याच्या मृत्यूनंतर इ. स. १२३६ मध्ये त्याची मुलगी रझिया ही दिल्लीच्या गादीवर आली.

**सुलताना रझिया** : अल्तमशाने रझियास उत्तम प्रकारचे शिक्षण दिले होते. अल्तमशाच्या काळात तिला राज्यकारभाराचा अनुभव मिळाला होता. ती कर्तबगार, पराक्रमी व प्रजाहितदक्ष होती. मात्र एखाद्या स्त्रीने सत्ताधीश होणे ही गोष्ट त्या काळात समाजाला मान्य होण्यासारखी नव्हती. त्यामुळे तिला दरबारातील अनेक सरदारांचा विरोध झाला. सरदारांवर नियंत्रण ठेवण्याच्या प्रयत्नांत तिला यश आले नाही. इ. स. १२४० मध्ये तिचा खून झाला. दिल्लीचे सुलतानपद भूषवणारी रझिया ही पहिली व एकमेव स्त्री होय.

**बल्बन** : सुलताना रझियानंतर दिल्लीच्या गादीवर आलेला महत्त्वाचा सुलतान म्हणजे बल्बन हा होय. बल्बन याने सिंध, अयोध्या, बंगाल येथील बंडखोर सरदारांचे पारिपत्य केले. पंजाबमधील सत्ता मजबूत केली. मंगोल आक्रमकांचा बंदोबस्त करून त्याने भारताची वायव्य सरहद्द सुरक्षित केली. इ. स. १२८६ मध्ये बल्बनाचा मृत्यू झाला.

बल्बन हा एक कुशल प्रशासक व धाडसी सेनानी होता. तो विद्येचा भोक्ता होता. अमीर खुसरौ हा प्रसिद्ध कवी व तत्वज्ञ त्याच्या दरबारी होता.

**अल्लाउद्दीन खल्जी** : अल्लाउद्दीन खल्जी इ. स. १२९६ मध्ये दिल्लीचा सुलतान झाला. विशाल साम्राज्य स्थापन करावे अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याच्या कारकिर्दीत मंगोलांनी वायव्य भारतावर स्वाऱ्या करून तो प्रदेश जिंकण्याचा प्रयत्न केला. गाजी मलिक व मलिक काफूर या अल्लाउद्दीन खल्जीच्या सरदारांनी मंगोलांचा पराभव केला. अल्लाउद्दिनाने रणथंभोर व चितोड हे राजपुतांचे किल्ले काबीज केले. त्यामुळेच माळवा जिंकणे त्याला सोपे झाले. दिल्लीच्या सुलतानशाहीचा प्रादेशिक विस्तार दक्षिण भारतात करण्याची सुरुवात अल्लाउद्दीन खल्जीच्या काळात झाली. त्याचा सेनापती मलिक काफूर याने देवगिरीचे यादव, वरंगळ येथील काकतीय, द्वारसमुद्र येथील होयसळ आणि मदुरैचे पांड्य या सत्तांचा पराभव केला व त्यांना मांडलिक केले.

अल्लाउद्दिनाने प्रशासन कार्यक्षम केले. जमीन महसूलव्यवस्थेत सुधारणा केली. आपल्या सैन्याला जीवनावश्यक वस्तू योग्य दरात मिळाव्यात म्हणून वस्तूंच्या किमती ठरवून दिल्या. वजने व मापे यांवर कडक नियंत्रण घातले. इ. स. १३१६ मध्ये अल्लाउद्दीन मरण पावला. अल्लाउद्दिनाच्या नंतरचा महत्त्वाचा सुलतान म्हणजे मुहम्मद तुघलक हा होय.

**मुहम्मद तुघलक** : इ. स. १३२५ मध्ये मुहम्मद तुघलक सत्तेवर आला. त्याच्या कारकिर्दीत दिल्लीच्या सुलतानशाहीचा प्रादेशिक विस्तार सर्वाधिक झाला होता. त्याच्या साम्राज्यात पेशावरपासून दक्षिणेस मदुरैपर्यंत आणि पश्चिमेस सिंधपासून पूर्वेस आसामपर्यंतचा प्रदेश होता.

विस्तृत पसरलेल्या आपल्या साम्राज्याच्या कारभारात सुधारणा करण्याचा मुहम्मदाने प्रयत्न केला. साम्राज्याची राजधानी मध्यवर्ती ठिकाणी असावी आणि मगोल आक्रमणापासून रक्षण व्हावे, म्हणून त्याने राजधानी दिल्लीहून देवगिरी येथे आणली. देवगिरीचे नाव त्याने दौलताबाद असे ठेवले. परंतु सुलतान व प्रजा यांची तेथे नीट व्यवस्था न झाल्याने त्याने सर्वांना दिल्लीला परत जाण्याचा हुकूम सोडला. या सर्व प्रकारात प्रजेचे अतोनात हाल झाले. आपली चूक लक्षात आल्यावर त्याने प्रजेला नुकसानभरपाई देण्याचा प्रयत्न केला. त्याने चलनव्यवस्थेत

सुधारणा करण्यासाठी, प्रचारात असलेल्या सोन्या- चांदीच्या नाण्यांऐवजी तांब्याची नाणी उपयोगात आणण्याचा हुकूम दिला. पण तांब्याची नाणी पाडण्यावर नियंत्रण न ठेवल्याने सोन्याची व चांदीची नाणी दुर्मिळ झाली. व्यापारावर याचा विपरीत परिणाम होऊ लागला. तेव्हा मुहम्मदाने तांब्याची नाणी परत घेऊन त्याऐवजी सोन्या-चांदीची नाणी देण्याचे आदेश दिले. परिणामी सरकारी तिजोरीवर प्रचंड ताण पडला. मुहम्मद तुघलक कल्पक होता; परंतु आपल्या कल्पना व्यवहारात आणण्यासाठी लागणारे कौशल्य त्याच्यापाशी नव्हते. त्यामुळे त्याच्या चांगल्या कल्पनाही अयशस्वी झाल्या.

मुहम्मद तुघलकाच्या अखेरच्या काळात सर्वत्र अशांतता व बंडाळी निर्माण झाली. त्याच्या हयातीतच त्याच्या साम्राज्याच्या विघटनास सुरुवात झाली. सिंध येथील उठावाचा बीमोड करत असतानाच त्याचा इ. स. १३५१ मध्ये मृत्यू झाला.

मुहम्मद तुघलकानंतर फिरोझ तुघलक दिल्लीचा सुलतान झाला. सुलतानशाहीविरुद्ध ठिकठिकाणी सुरू झालेली बंडाळी मोडून काढण्यात त्यालाही यश आले नाही. मात्र याही परिस्थितीत त्याने लोककल्याणाची काही कामे केली. सार्वजनिक बांधकाम खाते सुरू केले. सतलज व यमुना नद्यांवर कालवे काढले. अनेक कालवे त्याने दुरुस्त केले. हिस्सार व फिरोझाबाद ही नवी शहरे वसवली.

नासिरुद्दीन महमूद हा तुघलक घराण्यातील शेवटचा सुलतान (इ. स. १३९४-१४१२). नासिरुद्दिनाच्या कारकिर्दीत इ. स. १३९८ मध्ये मंगोल सत्ताधीश तिमूरलंग याने भारतावर स्वारी केली. दिल्ली आणि आसपासच्या प्रदेशातून अगणित लूट घेऊन तो मायदेशी परतला.

सुलतानशाहीतील नाणी

तुघलकानंतर दिल्लीच्या गादीवर सय्यद घराण्याची सत्ता होती. सय्यद घराण्यानंतर लोदी घराण्याची सत्ता स्थापन झाली. इब्राहीम लोदी हा शेवटचा सुलतान ठरला. त्याच्या स्वभावदोषामुळे त्याला अनेक शत्रू निर्माण झाले. अफगाण

सरदारही त्याचे विरोधक बनले. पंजाबचा सुभेदार दौलतखान लोदी याने काबूल-कंदाहारचा सत्ताधीश बाबर यास इब्राहीम लोदीविरुद्ध पाचारण केले. इ. स. १५२६ मध्ये बाबराने इब्राहीम लोदीचा पराभव केला आणि त्याचबरोबर सुलतानशाहीचा शेवट झाला.

**स्वाध्याय**

१. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) दिल्ली येथील कुतुबमिनाराचे बांधकाम -------- याच्या कारकिर्दीत पूर्ण झाले.
(कुतुबुद्दीन् ऐबक, अल्तमश, बल्बन)

(आ) अल्तमशाने चलनव्यवस्थेत सुधारणा करून ------ हे चांदीचे नाणे प्रचारात आणले.
(रुपया, होन, टंका )

(इ) दिल्लीच्या गादीवर बसणारी ---------- ही एकमेव स्त्री होय.
(चांदबिबी, नूरजहान, सुलताना रझिया)

(ई) प्रसिद्ध कवी व तत्त्वज्ञ अमीर खुसरौ ------- याच्या दरबारी होता.
(अल्तमश, बल्बन, सिकंदर लोदी)

२. योग्य त्या जोड्या लावा :

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) मुहम्मद घुरी | (१) मदुरैचे पांड्य यांचा पराभव |
| (आ) मलिक काफूर | (२) मराठ्यांचा पराभव |
| (इ) बाबर | (३) कनोजचा राजा जयचंद याचा पराभव |
| | (४) इब्राहीम लोदीचा पराभव |

३. पुढील प्रश्नांची दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा :

(अ) सुलताना रझियाला दरबारातील अनेक सरदारांनी विरोध का केला ?

(आ) अल्लाउद्दीन खल्जीने कोणकोणत्या सुधारणा केल्या ?

४. पुढील घटना कालानुक्रमे लिहा :

(अ) कुतुबुद्दीन ऐबक दिल्लीचा सुलतान झाला.

(आ) पृथ्वीराज चौहानाचा मुहम्मद घुरीने पराभव केला.

(इ) मुहम्मद तुघलक सत्तेवर आला.

(ई) सुलताना रझिया दिल्लीच्या गादीवर बसली.

● ● ●

# ५. विजयनगर आणि बहमनी राज्ये

तुघलक सत्तेच्या विघटनास मुहम्मद तुघलकाच्या कारकिर्दीतच सुरुवात झाली. दक्षिण भारतावरील तुघलकांची सत्ता नष्ट होऊन विजयनगर आणि बहमनी ही दोन प्रबळ राज्ये उदयाला आली.

### विजयनगरचे राज्य

**स्थापना :** तुघलकांची सत्ता कमकुवत झाल्यानंतर हरिहर व बुक्क या दोन बंधूंनी इ. स. १३३६ मध्ये कृष्णा व तुंगभद्रा नद्यांमधील प्रदेशात स्वतंत्र राज्य स्थापन केले. त्याआधी ते मुहम्मद तुघलकाचे दक्षिणेतील सरदार होते. त्यांनी तुंगभद्रा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर विजयनगर येथे आपली राजधानी उभारली. या शहरावरून त्यांच्या राज्यास विजयनगरचे राज्य असे म्हणतात. हरिहर हा विजयनगरचा पहिला राजा होय.

हरिहराने आपल्या कारकिर्दीत तुंगभद्रा नदीच्या परिसरातील प्रदेश, कोकणचा काही भाग आणि मलबारचा किनारी प्रदेश जिंकून घेतला. नव्यानेच उदयाला आलेल्या बहमनी सत्तेशी त्याला संघर्ष करावा लागला. इ. स. १३५३ मध्ये हरिहराचा मृत्यू झाला. नंतर त्याचा भाऊ बुक्क सत्तेवर आला. त्याच्या काळात बहमनी सत्तेशी विजयनगरचा संघर्ष अधिकच तीव्र झाला. बुक्क इ. स. १३७९ मध्ये मरण पावला.

**राज्यविस्तार :** बुक्कानंतर दुसरा हरिहर सत्तेवर आला. त्याच्या काळातही बहमनी सत्तेशी संघर्ष सुरूच राहिला. त्याचा सेनापती गुंड याने कारवार, म्हैसूर, तिरुचिरापल्ली, कांची इत्यादी प्रदेश जिंकून घेतले. दुसरा हरिहर इ. स. १४०४ मध्ये मरण पावला.

इ. स. १५०९ मध्ये सत्तेवर आलेल्या कृष्णदेवराय याच्या कारकिर्दीत विजयनगरचे राज्य वैभवाच्या शिखरावर पोहचले. त्याने उडीसाच्या राजाचा पराभव करून विजयवाडा व राजमहेंद्री हे भाग आपल्या राज्याला जोडले; तसेच विजापूरच्या आदिलशाहाचा रायचूर दोआबाचा सुपीक प्रदेश जिंकून घेतला. तेलंगणाचा काही भागही त्याने आपल्या राज्याला जोडला. त्याच्या कारकिर्दीत विजयनगरचे राज्य

सम्राट अकबर

(भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे यांच्या सौजन्याने)

लघुचित्रशैली, पंधरावे शतक

मुघल चित्रशैली, सतरावे शतक

पूर्वेस कटकपासून पश्चिमेस गोव्यापर्यंत व उत्तरेस रायचूर दोआबापासून दक्षिणेस हिंदी महासागरापर्यंत पसरलेले होते. पश्चिम किनाऱ्यावर नुकत्याच आलेल्या पोर्तुगिजांशी त्याने सलोख्याचे सबंध ठेवले.

व्यापारवृद्धी तसेच कला व साहित्याचा विकास यांकडेही कृष्णदेवरायाने विशेष लक्ष पुरवले. त्याने 'आमुक्तमाल्यदा' हा राजनीतिविषयक तेलुगु ग्रंथ लिहिला. तो संगीतज्ञही होता. डोमिंगो पेस या पोर्तुगीज प्रवाशाने त्याचे वर्णन 'महान न्यायी राज्यकर्ता' असे केले आहे. इ. स. १५३० मध्ये कृष्णदेवरायाचा मृत्यू झाला.

कृष्णदेवराय

कृष्णदेवरायानंतर विजयनगरच्या राज्याला उतरती कळा लागली. विजयनगरचा राजा रामराया याच्या कारकिर्दीत इ. स. १५६५ मध्ये तालिकोट येथे युद्ध झाले. त्यात आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही आणि बरीदशाही यांनी एकत्र येऊन विजयनगर राज्याचा पराभव केला. त्यानंतर हे राज्य अनेक लहान-लहान राज्यांत विभागले गेले.

**विजयनगरचे प्रशासन** : विजयनगरच्या राजांचा प्रजेविषयीच्या आपल्या कर्तव्यांचे पालन करण्यावर कटाक्ष होता. लोकांच्या हिताची काळजी घेतली पाहिजे, असा कृष्णदेवरायाचा दंडक होता. प्रशासनाच्या कामात राजाला मदत करण्यासाठी प्रधानमंडळ असे. कारभाराच्या सोईसाठी राज्याची अनेक प्रांतांत विभागणी केलेली होती. प्रांताला 'मंडलम्' असे म्हणत. प्रांताचे उपविभाग केलेले असत. प्रत्येक उपविभागाला 'नाडू' असे नाव होते. गाव हा सर्वांत छोटा प्रशासकीय घटक होता.

जमीनमहसूल व व्यापारी कर हे राज्याच्या उत्पन्नाचे प्रमुख साधन होते. शेतीला पाणीपुरवठा करण्यासाठी कालवे बांधण्यात आले होते. विजयनगरच्या राज्यकर्त्यांनी व्यापारवृद्धीकडेही विशेष लक्ष पुरवले. मध्य आशिया, श्रीलंका, चीन इत्यादी प्रदेशांशी विजयनगरचा व्यापार चाले. विजयनगरला भेट दिलेल्या अब्दुर रझाक,

नूनीझ, इब्न बतूता इत्यादी परकीय प्रवाशांनी आपल्या प्रवासवर्णनांत विजयनगरच्या समृद्धीचे व भरभराटीचे वर्णन केले आहे.

**बहमनी राज्य**

**स्थापना** : मुहम्मद तुघलकाच्या कारकिर्दीत दक्षिणेतील काही सरदारांनी त्याच्याविरुद्ध बंड केले. दौलताबाद हस्तगत करून त्यांनी इ. स. १३४७ मध्ये हसन गंगू बहमनशाह याची सुलतान म्हणून नेमणूक केली. बहमनशाहाच्या राज्यास 'बहमनी राज्य' असे म्हणतात.

**राज्यविस्तार** : बहमनशाहाने गुलबर्गा येथे आपली राजधानी स्थापन केली. बिदर, मालखेड, दाभोळ, गोवा, कोल्हापूर आणि तेलंगण इत्यादी प्रदेश जिंकून त्याने आपल्या राज्याचा विस्तार केला. इ. स. १३५८ मध्ये तो मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा मुलगा पहिला महंमदशाह सत्तेवर आला. विजयनगर, वरंगळ या सत्तांशी त्याचा संघर्ष झाला. त्याने प्रशासनव्यवस्था चोख ठेवली. अनेक विद्वानांना त्याने आश्रय दिला. त्याच्या काळात गुलबर्गा हे विद्येचे केंद्र म्हणून ओळखले जात असे.

इ. स. १४२२ मध्ये सुलतानपदी आलेल्या अहमदशाह याने गुलबर्गा येथून राजधानी हालवून बिदर येथे नेली. विजयनगरचा राजा दुसरा देवराय याचा त्याने पराभव केला. अहमदशाहाने वरंगळ सत्तेविरुद्धही जय मिळवला व ते राज्य काबीज केले. माळव्याचा सुलतान हुशंगशाह यास त्याने पराभूत केले. कोकणातील काही प्रदेशही त्याने जिंकून घेतला. तो विद्या व कला यांचा आश्रयदाता होता.

पुढे सत्तेवर आलेला तिसरा महंमदशाह (इ. स. १४६३—१४८२) याच्या काळात त्याचा वजीर महमूद गावान याने उडीसा व विजयनगर येथील सत्तांविरुद्ध विजय मिळवले. कोकणातील अनेक दुर्गम किल्ले जिंकून घेतले. बहमनी राज्याची हद्द गोवा व उडीसापर्यंत वाढवली.

महमूद गावानने प्रशासनात सुधारणा केल्या. जहागिरी देण्याऐवजी त्याने सैनिकांना रोख पगार देण्यास सुरुवात केली. जमिनीची फेरमोजणी करून जमीन महसुलाचा दर निश्चित केला. प्रांतप्रमुखांच्या मनमानीला आळा घालण्यासाठी राज्याची चारऐवजी लहान-लहान आठ प्रांतांत विभागणी केली; तसेच प्रांताधिकाऱ्यांच्या अधिकारांतही बरीच कपात केली. गावान विद्याप्रेमी होता. बिदर

**महमूद गावानाने स्थापन केलेली मदरसा : बिदर**

येथे त्याने एक मदरसा सुरू केली. त्याचा स्वतःचा मोठा ग्रंथसंग्रह होता. गणित, वैद्यक व साहित्य या विषयांत त्याला चांगली गती होती. बहमनी राज्याच्या जडणघडणीत महमूद गावानचा फार मोठा वाटा होता.

पंधराव्या शतकाच्या अखेरीस बहमनी सत्तेला उतरती कळा लागली. राज्यातील सरदारांमधील दुफळी व गटबाजी यांमुळे बहमनी सत्ता दुबळी झाली. विजयनगरशी झालेल्या संघर्षाचा बहमनी राज्याच्या लष्करी सामर्थ्यावर प्रतिकूल परिणाम झाला. केंद्रीय सत्तेचा अंकुश कमी होताच प्रांताधिकारी स्वतंत्र झाले. त्यामुळे बहमनी राज्याचे विघटन झाले. वऱ्हाडची इमादशाही, अहमदनगरची निजामशाही, बिदरची बरीदशाही, विजापूरची आदिलशाही व गोवळकोंड्याची कुतुबशाही अशी या राज्याची पाच शकले झाली. पुढे इमादशाहीचे राज्य निजामशाहाने जिंकून घेतले (इ. स. १५७४); तसेच बरीदशाहीचे राज्य आदिलशाहाने जिंकून आपल्या राज्यास जोडले (इ. स. १६१९). अशा रीतीने बरीदशाही व इमादशाही ही दोन राज्ये नष्ट झाली.

## स्वाध्याय

१. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) विजयनगरचा पहिला राजा ------------ हा होय.
(बुक्क, हरिहर, देवराय)

(आ) कृष्णदेवरायाने ------------ विषयक ग्रंथ लिहिला.
(शेती, राजनीती, संगीत)

(इ) बहमनी राज्याची राजधानी ----------- याने गुलबर्गा येथे स्थापन केली.
(अहमदशाह, महमूद गावान, हसन गंगू बहमनशाह)

(ई) बिदर येथे एक मदरसा -------------- याने सुरू केली.
(तिसरा महंमदशाह, महमूद गावान, अहमदशाह)

२. योग्य त्या जोड्या लावा :

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) बहमनशाह | (१) विजयनगर साम्राज्याचा विस्तार. |
| (आ) कृष्णदेवराय | (२) बहमनी राज्याच्या प्रशासनात सुधारणा. |
| (इ) महमूद गावान | (३) विजयनगरमधील इमारती उभारल्या. |
| (ई) अहमदशाह | (४) बहमनी राज्याची राजधानी बिदर केली. |
| | (५) गुलबर्गा येथे राजधानी स्थापन केली. |

३. पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा :

(अ) कृष्णदेवरायाने सांस्कृतिक क्षेत्रात कोणती कामगिरी केली ?

(आ) महमूद गावानने प्रशासनात कोणत्या सुधारणा केल्या ?

४. पुढील प्रश्नांची सात ते आठ वाक्यांत उत्तरे लिहा :

(अ) विजयनगरच्या प्रशासनव्यवस्थेची माहिती द्या.

(आ) बहमनी राज्याचा विस्तार कसकसा होत गेला ते सांगा.

● ● ●

# ६. सुलतानशाही
## प्रशासन, अर्थव्यवस्था आणि समाजजीवन

सुलतानशाहीच्या काळात भारतातील बराच मोठा प्रदेश दिल्लीच्या सुलतानांच्या आधिपत्याखाली होता. एवढ्या मोठ्या प्रदेशावर राजधानीतून अंमल चालवणे अवघड होते. त्यामुळे या काळातील सत्ताधीशांना स्थानिक प्रशासनासाठी भारतात पूर्वीच रूढ झालेल्या सामंतशाही व्यवस्थेचा आधार घ्यावा लागला. येथील ग्रामव्यवस्था त्यांनी बदलली नाही. केंद्रीय शासन चालवण्यासाठी मात्र त्यांनी इराणमधील प्रशासन पद्धतीचा बव्हंशी वापर केला.

**केंद्रीय प्रशासन** : सुलतान हा प्रशासनाचा प्रमुख होता. त्याची सत्ता अनियंत्रित होती. सुलतानाला प्रशासनाच्या कामात विविध अधिकारी मदत करत.

'वजीर' हा प्रशासनातला सर्वांत महत्त्वाचा अधिकारी होता. सुरुवातीला तो फक्त लष्करी नेतृत्व करी. पुढील काळात राज्याचा वसूल आणि खर्च यांचा हिशोब ठेवण्याचे कामही त्याच्याकडे आले. वजिराच्या मदतीला अनेक दुय्यम अधिकारी असत. 'अरिझ-इ-मुमालिक' हा वजिरानंतरचा दुसरा महत्त्वाचा अधिकारी. सैन्यभरती करणे, लष्कराला शस्त्रसज्ज ठेवणे ही त्याची कामे असत. राज्याचा सर्व पत्रव्यवहार सांभाळणारा अधिकारी 'दिवाण-इ-इन्शा' हा असे. 'दिवाण-इ-रिसालत' धार्मिक व्यवहार व दानधर्मादी कामे पाही. याशिवाय अन्य खाती सांभाळणारे इतर काही अधिकारी असत.

**प्रांतिक प्रशासन** : प्रशासनाच्या सोईसाठी राज्याची विविध प्रशासकीय विभागांत विभागणी केलेली होती. त्यांना 'इक्ता' असे म्हणत. 'इक्ता'चे विभाजन अनेक 'शिक'मध्ये केलेले होते, तर 'शिक'चे विभाजन 'परगणा' या उपविभागांत केलेले होते. अनेक खेडी मिळून एक परगणा बनत असे.

प्रत्येक इक्तावर 'मुफ्ती' हा प्रमुख अधिकारी असे. त्याच्या मदतीला इतर अधिकारी असत. इक्ताच्या प्रशासनाची त्याचप्रमाणे कायदा, सुव्यवस्था आणि महसूलवसुलीची जबाबदारी 'मुफ्ती'वर असे. 'शिक'वरील 'शिकदार' हा प्रमुख अधिकारी आणि परगण्यावरील 'अमीन' हा अधिकारी हे मुफ्तीच्या नियंत्रणाखाली असत.

शहराच्या प्रशासनासाठी 'कोतवाल' हा अधिकारी जबाबदार असे. शहरात शांतता व सुव्यवस्था राखण्याचे काम त्याच्याकडे असे.

**आर्थिक जीवन** : या काळात अन्नधान्याच्या उत्पादनाबरोबरच नगदी पिके घेण्यास सुरुवात झाली होती. भारताचा व्यापारही वाढला होता. मसाल्याचे पदार्थ आणि चंदन यांना परदेशांत विशेष मागणी होती. भारतातून मलमल, इतर प्रकारचे कापड व अन्नधान्य यांचीही आग्नेय आशिया, पूर्व आफ्रिका, युरोप या प्रदेशांत निर्यात होत असे.

प्रशासनाचा वाढता व्याप, तसेच व्यापारवृद्धी यांमुळे भारतात ठिकठिकाणी नगरांचा उदय झाला. दिल्ली, लाहोर, मुलतान, लखनऊ, अनहिलवाडा, खंबायत, सोनारगाव ही शहरे भरभराटीस आली. बहुतेक नगरे व्यापारी दृष्टीने महत्त्वाची होती. काही नगरे प्रशासनाच्या दृष्टीने आणि लष्करी केंद्रे म्हणून महत्त्वाची होती. काही नगरांना तीर्थक्षेत्रे म्हणून महत्त्व प्राप्त झाले होते. शहरात प्रामुख्याने व्यापारी, कारागीर, सरकारी नोकर इत्यादी लोकांचा भरणा असे. बहुसंख्य प्रजा ग्रामीण भागात राहत असे. नगरांतील लोकांच्या गरजा भागवण्यासाठी नगरांत अनेक व्यवसाय-उद्योग सुरू झाले. काही नगरे विशिष्ट वस्तूंच्या उत्पादनासाठी प्रसिद्धीस आली. उदाहरणार्थ, रेशमी कापडासाठी कांजीवरम व मदुरै, बिदरी कामासाठी बिदर व गोवळकोंडा, मिनाकामासाठी राजस्थानातील शहरे नावारूपाला आली.

**समाजजीवन** : सुलतानशाहीच्या काळात भारतावर राज्य करणारे तुर्की आणि अफगाण सुलतान आणि त्यांचे प्रमुख सरदार हे धर्माने मुसलमान होते; परंतु त्यांची बहुसंख्य प्रजा हिंदू होती. भाषा, धर्म व संस्कृती या दृष्टींनी भिन्न असलेल्या आपल्या प्रजेवर राज्य करताना आपल्या मध्य आशियाई कल्पनांना चिकटून राहणे सुलतानांना शक्य नव्हते. राज्य चालवण्यासाठी प्रजेचे सहकार्य व सहभाग त्यांना आवश्यक होता. सुलतानांनी आपले प्रशासन चालवण्यासाठी येथील स्थानिक लोकांची मदत घेतली. त्यांना महत्त्वाच्या जागा दिल्या. अनेक भारतीय प्रशासकीय कल्पना त्यांनी स्वीकारल्या. पाटील, कुलकर्णी, देशमुख, देशपांडे इत्यादी हुद्द्यांचा त्यांनी आपल्या प्रशासनात समावेश केला. येथील अनेक रीतिरिवाज त्यांनी आत्मसात केले. सुलतानशाहीतील काही नाण्यांवर 'श्री' हे अक्षर कोरलेले आढळते. काही नाण्यांवर 'हिजरी' सनाबरोबर 'शक' आणि 'संवत' यांचीही नोंद आढळते.

प्रजाजनांनीही राज्यकर्त्यांचे अनेक आचार-विचार, रूढी यांचा स्वीकार केला. ते प्रशासनात व सैन्यात भरती होऊ लागले. सुलतानजी, साहेबराव, अर्जोजी, शाहजी, शरीफजी यांसारखी व्यक्तिनामे त्यांनी स्वीकारली. पेशवा, पारसनवीस, सबनीस, मुजुमदार, जमेदार अशी हुद्द्यांची नावे येथे रूढ झाली. मात्र बहुसंख्य लोकांच्या पारंपरिक आयुष्यक्रमात फारसा बदल झाला नाही. जातिव्यवस्था पूर्वीसारखीच कडक होती. स्त्रियांची स्थिती तर या काळात अधिकच खालावली. उच्च वर्गातील स्त्रियांमध्ये पडदा-पद्धत या काळात रूढ झाली.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :
   (अ) वजीर प्रशासनातील कोणती कामे करत असे ?
   (आ) सुलतानशाही काळात कोणती शहरे भरभराटीस आली ?
   (इ) सुलतानशाही काळात कोणत्या वस्तूंना परदेशातून मागणी होती ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :
   (अ) सुलतानशाहीत प्रशासनातला सर्वांत महत्त्वाचा अधिकारी ---------- हा होता. (शिकदार, वजीर, कोतवाल)
   (आ) रेशमी कापडासाठी ---- हे शहर प्रसिद्धीस आले. (बिदर, कांजीवरम, सोनारगाव)
   (इ) वजिराखालोखाल ---- हा महत्त्वाचा अधिकारी होता. (दिवाण-इ-रिसालत, अरिझ-इ-मुमालिक, मुफ्ती)

३. तक्ता पूर्ण करा :

| प्रांतिक प्रशासनाचा विभाग | विभागाचा अधिकारी |
|---|---|
| (अ) इक्ता | (अ) ------ |
| (आ) शिक | (आ) ------ |
| (इ) परगणा | (इ) ------ |
| (ई) शहर | (ई) ------ |

४. पुढे दिलेल्या मुद्द्यांची प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत माहिती द्या :
   (अ) सुलतानशाही काळातील व्यापार.
   (आ) सुलतानशाही काळातील नगरांचा विकास.

● ● ●

# ७. सांस्कृतिक विकास
## इ. स. १२०० ते १५००

तुर्की सुलतानांच्या आगमनानंतर भारतीय संस्कृती आणि मध्य आशियाई संस्कृती यांचा घनिष्ठ संबंध आला आणि भारतीय संस्कृतीच्या विविध क्षेत्रांत भर पडली.

**वास्तुशैलीचा विकास** : चबुतऱ्यावर बांधलेली वास्तू, समोरासमोरील भिंतीना जोडणाऱ्या नक्षीदार कमानी, घोटीव घुमट, नक्षीदार जाळी ही मध्य आशियाई वास्तुकलेची वैशिष्ट्ये होती. तुळयांचे बांधकाम, विविध प्रकारचे स्तंभ, शोभिवंत कळस, भिंतीवरील बारीक कोरीव काम ही भारतीय वास्तुकलेची वैशिष्ट्ये होती. प्रत्यक्ष वास्तू उभारताना भारतीय शैलीची काही वैशिष्ट्ये सुलतानकालीन वास्तूंत स्वाभाविकपणे मिसळली गेली. त्यातून एक नवी भारतीय वास्तुशैली उदयास आली.

दिल्ली येथील कुतुबमिनाराचे बांधकाम कुतुबुद्दीन ऐबकाच्या काळात सुरू झाले. या मिनाराची संकल्पना मध्य आशियाई असून त्याच्या बांधकामाची ढब भारतीय आहे.

गुलबर्गा येथील जामी मशीद हा बहमनी राजवटीतील स्थापत्याचा एक नमुना आहे. लहान-लहान घुमटांनी आच्छादित केलेले प्रांगण हे या मशिदीचे वैशिष्ट्य आहे. विजापूर येथे मुहम्मद आदिलशाह याने बांधलेला गोलघुमट हे जगातील एक आश्चर्य समजले जाते. या घुमटाच्या आतील बाजूस असलेल्या सज्जांमध्ये उभे राहून आवाज केल्यास त्याचे अनेक प्रतिध्वनी ऐकू येतात.

कुतुबमिनार : दिल्ली

गोलघुमट : विजापूर

कोणार्क येथील तेराव्या शतकात बांधलेले सूर्यमंदिर ही एक अतिभव्य वास्तू आहे. संपूर्ण वास्तू हा सूर्यरथ आहे असे कल्पून या वास्तूची रचना केलेली आहे. या मंदिराच्या दोन्ही बाजूंस दगडांमध्ये चोवीस भव्य चाके कोरलेली आहेत. मंदिराच्या भिंतींवरील कोरीव काम हा कलेचा अप्रतिम नमुना आहे.

सूर्यमंदिर : कोणार्क

विजयनगरमधील हजार राम मंदिर आणि विठ्ठल मंदिर यांवरील शिल्पकाम अप्रतिम आहे. विठ्ठल मंदिरातील मंडप वैशिष्ट्यपूर्ण आहे. दौडत जाणाऱ्या घोडेस्वारांची शिल्पे या मंदिराच्या स्तंभांवर कोरलेली आहेत.

**चित्रकला** : सुलतानशाहीच्या काळात अरबांनी भारतात प्रथमच कागद आणला. त्यानंतर जैन ग्रंथकारांनी आपल्या ग्रंथांसाठी कागदावर काढलेली चित्रे वापरण्यास सुरुवात केली. या चित्रांमध्ये इराणी शैलीचे अनुकरण होऊ लागले. नाजूक रंगकाम केले जाऊ लागले.

**संगीत** : गोपाळ नायक या तत्कालीन संगीतज्ञाचा अमीर खुसरौवर फार मोठा प्रभाव होता. या दोघांनी आधुनिक हिंदुस्थानी संगीताचा पाया घातला असे मानले जाते. या काळातील संतांनी आपल्या अनुयायांना उपदेश करण्यासाठी भजने, कवने, कव्वाली हे काव्यप्रकार उपयोगात आणले. त्यामुळे संगीतकला लोकप्रिय होण्यास साहाय्य झाले. अमीर खुसरौ याने भारतीय वीणा व इराणी तंबोरा यांच्या एकत्रीकरणातून 'सतार' हे तंतुवाद्य बनवले.

**वाङ्मय** : रामानुज, मध्वाचार्य व वल्लभाचार्य यांचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ, तसेच विज्ञानेश्वर याचा 'मिताक्षरा' हा ग्रंथ, हे संस्कृत ग्रंथ याच काळातील होत. फारसी भाषेतही या काळात ग्रंथ निर्माण झाले. अमीर खुसरौने अनेक काव्यसंग्रह फारसी भाषेत लिहिले. 'शिरी खुसरौ' व 'आईन-इ-सिकंदरी' हे काव्यग्रंथ खुसरौच्या सर्वोत्कृष्ट कलाकृतींपैकी मानले जातात. खुसरौने हिंदीतही काव्यरचना केली. झियाउद्दीन बरनी याने फारसी भाषेत इतिहासलेखन केले. सुलतानशाहीच्या काळात 'राजतरंगिणी', 'महाभारत' यांसारख्या काही संस्कृत ग्रंथांची फारसीत भाषांतरे झाली.

उर्दू भाषेचा उदय सुलतानशाहीच्या काळात झाला. दरबारात वापरली जाणारी फारसी भाषा व प्रजाजनांची हिंदी भाषा यांच्या मिश्रणातून उर्दू भाषा उदयाला आली. दक्षिण भारतात या भाषेला 'दख्खनी' असे नाव मिळाले.

सुलतानशाहीच्या काळात मराठी, हिंदी, बंगाली व अंन्य प्रादेशिक भाषांचा विकास झाला. तत्कालीन संतांनी आपली कवने प्रादेशिक भाषांत रचली. त्यामुळे प्रादेशिक भाषा संपन्न होऊ लागल्या.

मुकुंदराज याने लिहिलेला 'विवेकसिंधू' हा मराठीतला आद्य ग्रंथ मानला जातो.

म्हाइंभट्टाने लिहिलेला 'लीळाचरित' हा ग्रंथ, ज्ञानेश्वरांची 'भावार्थदीपिका'— म्हणजेच ज्ञानेश्वरी, नामदेवांचे अभंग, एकनाथांच्या गौळणी व भारुडे इत्यादी साहित्यरचना या काळात मराठी भाषेत झाल्या.

तुर्कांबरोबर मध्य आशियातील कलाशैली व साहित्य जसे भारतात पोहोचले त्याचप्रमाणे तेथील सुफी पंथाचे तत्त्वज्ञानही आले. सुफी पंथाचा भारतात प्रसार झाला. भारतात तेव्हा रूढ असलेला भक्ती संप्रदाय व सुफी संप्रदाय यांचा परस्परांवर प्रभाव पडला.

**भक्ती संप्रदाय :** कर्मकांडाऐवजी ईश्वरप्रेम, माणुसकी, भूतदया, करुणा इत्यादी मूल्यांची जोपासना करावी, ही भक्ती संप्रदायाची शिकवण आहे. भारतात भक्ती संप्रदायाची सुरुवात तमिळनाडूमध्ये अळवार संतांनी केली असे मानतात. जातिव्यवस्था आणि कर्मकांड यांनी सत्त्वहीन झालेल्या भारतीय समाजात भक्ती संप्रदायाने नवे चैतन्य निर्माण केले.

संत कबीर

दक्षिण भारतात रामानुज, निंबार्क, मध्वाचार्य, वल्लभाचार्य यांनी भक्ती संप्रदायाचा पाया भक्कम केला. ईश्वरभक्ती सर्वांसाठी आहे, ईश्वर जात-पात ओळखत नाही, तो फक्त भावाचा भुकेला असतो, असे उत्तरभारतातील संत रामानंद यांनी सांगितले. रामानंदांचे शिष्य संत कबीर यांनी जातिभेद, धर्मभेद हे कृत्रिम आहेत, सर्व मानव एक आहेत, अशी शिकवण दिली. राम आणि रहीम हे वेगळे नाहीत तर एकच आहेत, असे त्यांनी सांगितले. बंगालमध्ये चैतन्य महाप्रभूंनी भक्तीला सर्वश्रेष्ठ स्थान दिले.

कर्नाटकात बसवेश्वरांनी वीरशैव पंथाची शिकवण दिली. स्त्रिया आणि दलित यांना बसवेश्वरांनी मानाचे स्थान दिले. त्यांनी अस्पृश्यतेविरुद्ध मोहीम उभारली. जातिभेदाला विरोध केला. श्रमाची प्रतिष्ठा लोकांना समजावून सांगितली. साधेपणाने निर्मळ जीवन जगण्यावर त्यांनी भर दिला. स्त्रियांचा दर्जा त्यांनी उंचावला.

श्री बसवेश्वर

बसवेश्वरांच्या कार्याचा समाजावर खोलवर परिणाम झाला. सोळाव्या शतकात पुरंदरदास हे थोर संत कर्नाटकात होऊन गेले. त्यांनी कन्नड भाषेत अनेक भक्तिकवने रचली. आजही ती लोकप्रिय आहेत.

महाराष्ट्रातील भक्ती संप्रदायात श्री चक्रधरस्वामी, संत नामदेव व संत ज्ञानेश्वरांपासून संत तुकारामांपर्यंत दीर्घ अशी संतपरंपरा या काळात होऊन गेली. संत ज्ञानेश्वरांपासून सुरू झालेला वारकरी संप्रदाय हे महाराष्ट्रातील भक्ती संप्रदायाचे वैशिष्ट्य आहे. वारकरी संप्रदायातील संतांमध्ये समाजातील सर्व जाती-जमातींचे लोक होते. अनेक स्त्रियाही होत्या. या परंपरेतील संतांनी महाराष्ट्रात भक्तीचा प्रसार केला. ईश्वरावर निस्सीम भक्ती, मानवसमाजावर प्रेम, भूतदया ही वारकरी संप्रदायाच्या शिकवणुकीची काही महत्त्वाची वैशिष्ट्ये आहेत. पंढरपूर येथील विठ्ठल हे वारकऱ्यांचे आराध्यदैवत आहे. वर्षातून एकदा तरी पंढरपूरला सर्व विठ्ठल-भक्तांनी वारीच्या निमित्ताने एकत्र येण्याची प्रथा वारकरी संप्रदायाने घालून दिली. वारीच्या निमित्ताने सर्व जाती आणि पंथांचे लोक एकत्र येऊ लागले. त्यामुळे समाजात एकोप्याची भावना निर्माण होण्यास मदत झाली. वारकरी संतवाङ्मयामुळे मराठी साहित्य समृद्ध झाले आहे. संतवाङ्मयात अभंग, ओवी, गौळण, भारूड इत्यादी लोकसाहित्याचे प्रकार वापरले गेले. त्यामुळे संतसाहित्य अत्यंत लोकप्रिय झाले

संत नामदेव

संत ज्ञानेश्वर

संत तुकाराम

आणि घरोघरी पोहोचले. सोपी, रसाळ भाषा, रोजच्या जीवनातील उदाहरणे, सहज पाठ होण्यासारखी काव्यरचना यांमुळे संतसाहित्याने लोकमानसाची पकड घेतली.

**गुरुनानक** : लहानपणापासून चिकित्सक वृत्ती असलेले गुरुनानक कर्मकांडाला थोतांड मानत असत. संसारात त्यांचे लक्ष लागेना. ते साऱ्या देशभर फिरले. हिंदूंच्या तीर्थक्षेत्री गेले, तसेच मक्केलाही जाऊन आले. लोकांची भक्तिभावना सगळीकडे सारखी असते, हे त्यांच्या लक्षात आले. जो सर्वांना समत्वाने वागवील आणि भ्रष्ट जगात निर्मळ राहील तोच खरा धर्म, अशी त्यांची शिकवण होती. हिंदू आणि मुसलमान यांची एकजूट करून एकसंध समाज उभा करणे हे गुरुनानकांचे उद्दिष्ट होते. गुरुनानकांनी स्त्रियांना अत्यंत गौरवाचे स्थान दिले. 'स्त्री हाच मानवसृष्टीचा मूलाधार आहे', असे त्यांनी सांगितले.

गुरुनानक

गुरुनानकांच्या शिकवणीने अनेक लोक प्रभावित झाले. नानकांच्या शिष्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत गेली. गुरुनानकांनी

आपल्या शिष्यांना जो उपदेश केला तो एका ग्रंथात संगृहीत केलेला आहे. त्याला 'आदिग्रंथ' असे म्हणतात. गुरुनानकांच्या अनुयायांना शिष्य म्हणजे 'शीख' असे म्हणतात. 'आदिग्रंथ' ऊर्फ 'ग्रंथसाहेब' हा शिखांचा पवित्र धर्मग्रंथ आहे. गुरुनानकांनंतर शिखांचे नऊ गुरू झाले. गुरुगोविंदसिंग हे शिखांचे दहावे गुरू गुरुगोविंदसिंगांच्या आदेशाप्रमाणे त्यांच्या मृत्यूनंतर 'ग्रंथसाहेब' हा धर्मग्रंथच गुरू मानून शीखधर्मीय त्याचे पठण करतात.

**सुफी संप्रदाय** : सुफी संप्रदाय हा मूळचा इराणमधला. परमेश्वर प्रेममय आहे आणि प्रेम व भक्ती या मार्गानीच त्याच्यापर्यत पोहोचता येते अशी सुफी साधूंची श्रद्धा होती. हे साधू अत्यंत साधेपणाने राहत. सर्व प्राणिमात्रांवर प्रेम करावे, परमेश्वराचे चिंतन करावे, साधेपणाने राहावे, अशी त्यांची शिकवण होती. भारतात आलेल्या सुफी संतांपैकी ख्वाजा मोइनुद्दीन चिश्ती हे एक विख्यात तत्त्वज्ञ होते. त्यांच्याप्रमाणेच शेख निझामुद्दीन अवलिया हे एक थोर सुफी संत होते. सुफी संतांनी हिंदू आणि मुसलमान यांच्या ईश्वरविषयक कल्पनांतील साम्यस्थळे दाखवली. भागवत धर्मातील भक्तिकल्पनेचा सुफी पंथीयांवर प्रभाव पडला. पवित्र कुरआनप्रमाणेच ते इतर धर्मग्रंथांचाही आदर करत. सुफी संतांच्या शिकवणीचा परिणाम जसा मुसलमान समाजावर झाला तसाच तो हिंदू समाजावरही झाला आणि हे दोन्ही समाज जवळ येण्यास फार मोठा हातभार लागला.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :
   (अ) भक्ती संप्रदायाने कोणती शिकवण दिली ?
   (आ) सतार हे वाद्य कोणी व कसे निर्माण केले ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :
   (अ) रामानंदांचे शिष्य ---------- यांनी जातिभेद, धर्मभेद हे कृत्रिम आहेत असे सांगितले. (मध्वाचार्य, ख्वाजा मोइनुद्दीन चिश्ती, संत कबीर)
   (आ) कर्नाटकातील संत ------------ यांनी अस्पृश्यतेविरुद्ध मोहीम उभारली. (रामानुज, बसवेश्वर, मध्वाचार्य)
   (इ) मुकुंदराज यांनी लिहिलेला -------- हा मराठीतील आद्य ग्रंथ मानला जातो. (यथार्थदीपिका, भावार्थदीपिका, विवेकसिंधू)

(ई) झियाउद्दीन बरनी याने फारसी भाषेत ------------ केले.
(काव्यलेखन, इतिहासलेखन, कथालेखन)

३. पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यांत उत्तरे द्या :
(अ) अमीर खुसरौच्या वाङ्मयीन कार्याची माहिती सांगा.
(आ) गुरुनानक यांची शिकवण सांगा.
(इ) संत कबीरांची शिकवण थोडक्यात सांगा.
(ई) वारकरी संप्रदायाच्या शिकवणीचे सामाजिक महत्त्व सांगा.

४. दिलेल्या मुद्द्यांच्या आधारे पुढील प्रश्नांची पाच ते सहा वाक्यांत उत्तरे द्या :
(अ) भक्ती संप्रदाय
(१) भक्ती संप्रदायाची शिकवण
(२) भक्ती संप्रदायातील संत
(आ) सुफी संप्रदाय
(१) सुफी संप्रदायाची शिकवण
(२) सुफी संत

५. पुढील वास्तूंबद्दल माहिती सांगा :
(अ) कोणार्क येथील सूर्यमंदिर
(आ) विजापूर येथील गोलघुमट

६. उपक्रम :
भारतातील काही संतांची चित्रे मिळवा व त्यांची शिकवण सांगणाऱ्या काव्यरचनांच्या ओळी मिळवून त्याखाली लिहा.

● ● ●

# ८. युरोपातील घडामोडी व भारत

भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर इ. स. १४९८ मध्ये पोर्तुगीज खलाशी वास्को-द-गामा हा येऊन पोहोचला. इ. स. १५०९ साली अफोन्सो-द-अल्बुकर्क याची भारतात पोर्तुगिजांचा गव्हर्नर म्हणून नेमणूक झाली. त्याने पश्चिम किनाऱ्यावरील गोवा, कालिकत इत्यादी ठाणी जिंकून घेतली आणि पोर्तुगिजांची भारतातील सत्ता बळकट केली. पोर्तुगिजांच्या पाठोपाठ डच, इंग्रज, फ्रेंच इत्यादी युरोपीय व्यापारी भारताकडे वळले. पुढच्या दीड-दोनशे वर्षांच्या काळात या युरोपियनांनी भारतातील आपले बस्तान स्थिर केले.

या सर्व घडामोडींना कारणीभूत ठरलेली परिस्थिती आता आपण पाहू.

**युरोपातील प्रबोधन** : मध्ययुगीन युरोपवर धर्मसंस्थेचा प्रभाव होता. लोकांनी विश्वास ठेवावा, चिकित्सा करू नये, ही धर्मसंस्थेची भूमिका होती. प्रबोधनकाळात अनेक विचारवंतांनी ती नाकारली. चिकित्सक व बुद्धिवादी दृष्टिकोन यांवर त्यांनी भर दिला.

रॉजर बेकनने 'प्रयोग करा ! प्रयोग करा !' असे लोकांना सांगितले. इतर विचारवंतांनीही मानवतावाद, वैज्ञानिक दृष्टिकोन इत्यादी मूल्ये आपल्या लेखनाद्वारे रुजवण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे पंधराव्या शतकात युरोपमध्ये वैचारिक जागृती घडून आली. या वैचारिक जागृतीस 'प्रबोधन' असे म्हणतात. प्रबोधनामुळे समाजजीवनाच्या विविध क्षेत्रांत अनेक महत्त्वाचे बदल घडून आले.

**पहिले छपाई यंत्र, जर्मनी, इ. स. १४५०**

**प्रबोधनाचे स्वरूप :** प्रबोधनकाळापर्यंत लॅटिन हीच ग्रंथलेखनासाठी वापरली जाणारी भाषा होती. ही भाषा सामान्य लोकांना समजत नसे. प्रबोधनकाळात लोकभाषांतून ग्रंथनिर्मिती होऊ लागली. सामान्य माणसांच्या सुखदु:खाचे चित्रण या साहित्यातून होऊ लागले. सामान्य माणूस हा विचारांचे केंद्र बनला. इटालियन कवी डान्टे याने 'डिव्हाईन कॉमेडी' हा काव्यग्रंथ लिहिला. त्यात त्याने मानवी प्रेम, देशप्रीती, निसर्गसौंदर्याची ओढ या भावनांना प्राधान्य दिले. बोकॅशिओने इटालियन भाषेत कथालेखन करून आधुनिक गद्यवाङ्मयाचा पाया घातला. शेक्सपियर या इंग्रज नाटककाराने आपल्या नाटकांतून मानवी जीवनातील शोक आणि आनंद या दोन्ही भावनांचा परिपोष केला. याच काळात छपाईची कला अवगत झाल्यामुळे हे वाङ्मय लोकांपर्यंत पोहोचणे सुलभ झाले.

मोनालिसा

साहित्याप्रमाणेच कलाक्षेत्रातही अनेक बदल घडून आले. इटालियन चित्रकार लिओनार्डो-डा-व्हिंची याने 'मोनालिसा' हे एका युवतीचे काढलेले चित्र जगप्रसिद्ध आहे. त्या काळापर्यंत फक्त देवदेवतांनाच कलेत स्थान होते. लिओनार्डोने एका सामान्य युवतीचे चित्र काढून प्रचलित परंपरा झिडकारून टाकण्याचे धैर्य दाखवले. लिओनार्डोप्रमाणेच मायकेल अँजेलो, रॅफेल इत्यादी अनेक कलाकार प्रबोधनकाळात होऊन गेले.

**इंग्लंडमधील लोकशाहीचा उदय :** मध्ययुगाच्या उत्तरार्धात युरोपातील सर्व देशांत अनियंत्रित राजसत्ता निर्माण झाल्या. इंग्लंडमधील राजकीय व्यवस्था मात्र एका वेगळ्या दिशेने वाटचाल करू लागली. इ. स. १२१५ मध्ये इंग्लंडमधील सामंतांनी राजा जॉन याला प्रजेच्या हक्कांची सनद मंजूर करण्यास भाग पाडले. तिलाच 'मॅग्ना कार्टा' असे नाव आहे. या सनदेने इंग्लंडमधील लोकशाहीचा पाया

घातला. पुढील काळात मॅग्ना कार्टा या सनदेतील तत्त्वे अधिकाधिक विकसित होत गेली. 'पार्लमेंट' या लोकप्रतिनिधींच्या संस्थेचा उदय झाला. पार्लमेंटने इंग्लंडमधील सामान्य जनतेच्या हक्कांचे रक्षण करण्यासाठी राजेशाहीवर अंकुश ठेवण्यास सुरुवात केली. सतराव्या शतकात पहिल्या चार्ल्स राजाने पार्लमेंटचे अधिकार झुगारून देण्याचा प्रयत्न करताच लोकशाही समर्थकांनी त्याचा शिरच्छेद केला. दुसरा जेम्स यानेही लोकशाही संकेत मोडण्याचे धाडस करताच जनतेने त्याला पदच्युत केले. इ. स. १६८९ मध्ये इंग्लंडच्या पार्लमेंटने 'बिल ऑफ राइट्स' हा कायदा पास केला. जनतेच्या हक्कांची गंगोत्री म्हणून तो ओळखला जातो.

**नव्या जलमार्गांचा व भूमीचा शोध :** इ. स. १४५३ मध्ये कॉन्स्टँटिनोपल हे शहर तुर्कांच्या ताब्यात गेले. आशिया व युरोप यांना जोडणारे खुष्कीचे व्यापारी मार्ग या प्रदेशातून जात होते. हे मार्ग बंद झाल्यामुळे युरोपियनांच्या व्यापारावर गंभीर परिणाम झाला. युरोपला नव्या व्यापारी मार्गांची गरज भासू लागली.

इसवी सनाच्या तेराव्या शतकात मार्को पोलोने चीन-जपानपर्यंतचा प्रवास केला होता. त्याने केलेले पूर्वेकडील देशांचे वर्णन वाचून अनेकांच्या मनात आशियाई देशांबद्दल उत्सुकता निर्माण झाली होती. पूर्वेशी व्यापार करणारे इटलीमधील व्हेनिस शहरातील व्यापारी श्रीमंत होतात हेही अन्य युरोपीय देशांना समजून आले होते. होकायंत्र, भौगोलिक नकाशे, महासागरी नौका यांमुळे नौकानयन सुलभ झाले. युरोपातील काही राजे नौकानयनाच्या मोहिमांना आर्थिक साहाय्य करण्यास पुढे आले. पंधराव्या शतकाच्या शेवटच्या दशकात अशा मोहिमांना सुरुवात झाली. नवीन सागरी मार्ग व नवीन भूप्रदेश शोधण्यात आले.

इ. स. १४९२ मध्ये कोलंबस या इटालियन खलाशाने अमेरिका खंडाचा शोध लावला. या सफरीसाठी त्याला स्पेनच्या राजाने मदत केली. अटलांटिक महासागराच्या पश्चिम किनाऱ्याला असे एखादे खंड आहे याची त्या वेळी माहिती नव्हती. पृथ्वी गोल असल्यामुळे अटलांटिक ओलांडून पश्चिमेकडे गेले तर पूर्वेला भारतात पोहोचता येईल, अशा अपेक्षेने कोलंबस निघाला होता; परंतु तो अमेरिका खंडातील वेस्ट इंडिज बेटांच्या किनाऱ्याला लागला. त्याच्यानंतर व्हेस्पुसी अमेरिगो याने अमेरिका खंडाच्या अनेक फेऱ्या केल्या. त्याच्या नावावरूनच या खंडाला 'अमेरिका' हे नाव पडले.

वास्को-द-गामा हा पोर्तुगीज दर्यावर्दी आफ्रिका खंडाला वळसा घालून इ. स. १४९८ मध्ये भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील कालिकत बंदरात उतरला. मॅगेलान हा दुसरा पोर्तुगीज खलाशी दक्षिण अमेरिका खंडाला वळसा घालून प्रशांत महासागरापलीकडील फिलिपाइन्स बेटांत पोहोचला. एका झटापटीत तो तेथे मारला गेला; परंतु त्याचे साथीदार पूर्वेकडून येऊन पोर्तुगालला पोहोचले. पृथ्वीला पहिल्या प्रथम सागरी प्रदक्षिणा घालण्याचे श्रेय मॅगेलानला दिले जाते.

नव्या सागरी मार्गामुळे युरोप खंडाचा आशिया खंडाशी व्यापार मोठ्या प्रमाणावर वाढला. पुढील काळात युरोपीय देशांनी आशिया व आफ्रिका खंडांत आपल्या वसाहती निर्माण केल्या. पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतींचा परस्परांशी परिचय होऊन सांस्कृतिक देवाण-घेवाण सुरू झाली. भारतात वसाहत स्थापन करणारे पोर्तुगीज हे पहिले युरोपीय होत.

**वास्को-द-गामा आणि त्याचे जहाज**

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) रॉजर बेकनने लोकांना काय सांगितले ?

(आ) शेक्सपियरच्या नाटकांत कोणत्या मानवी भावनांचा परिपोष झाला आहे ?

(इ) इंग्लंडमधील लोकशाही समर्थकांनी चार्ल्स राजाचा शिरच्छेद का केला ?

(ई) प्रबोधनाच्या काळात नौकानयन कोणकोणत्या साधनांमुळे सुलभ झाले ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :
   (अ) इंग्लंडमधील लोकशाहीचा पाया --------- या सनदेने घातला.
   (बिल ऑफ राइट्स, चार्टर ॲक्ट, मॅग्ना कार्टा)
   (आ) इ. स. तेराव्या शतकात --------- ने चीन-जपानपर्यंत प्रवास केला होता.
   (मॅगेलान, मार्को पोलो, वास्को-द-गामा)
   (इ) कोलंबसाने --------- शोध लावला.
   (पश्चिम भारताचा, अमेरिका खंडाचा, दक्षिण आफ्रिकेचा)

३. पुढील प्रश्नांची पाच ते सहा वाक्यांत उत्तरे लिहा :
   (अ) प्रबोधन म्हणजे काय ?
   (आ) भौगोलिक शोधांचे जगावर कोणते परिणाम झाले ?

४. प्रबोधनकाळातील काही वैशिष्ट्ये पुढे दिली आहेत. त्यांच्याशी संबंधित असलेल्या साहित्यिकाचे/कलाकाराचे नाव त्या त्या घटनेसमोर लिहा :

   (अ) आपल्या साहित्यात देशप्रीती, मानवी प्रेम, निसर्गसौंदर्याची ओढ या भावनांना प्राधान्य दिले. (अ) --------
   (आ) इटालियन भाषेत कथालेखन करून आधुनिक गद्य लेखनाचा पाया घातला. (आ) ----------
   (इ) मोनालिसा हे एका सामान्य युवतीचे चित्र काढून प्रचलित परंपरा झिडकारून टाकण्याचे धैर्य दाखवले. (इ) ---------

५. पुढील विधाने त्यांच्यापुढे दिलेल्या विधानांतून योग्य तो पर्याय निवडून पूर्ण करा :
   (अ) पंधराव्या शतकात युरोपमध्ये वैचारिक जागृती घडून आली. कारण —
      (१) कोलंबसने अमेरिका शोधली.
      (२) काही विचारवंतांनी नवीन मूल्ये मांडली.
      (३) राष्ट्रराज्यांचा उदय झाला.
   (आ) युरोपला नव्या व्यापारी मार्गांची गरज निर्माण झाली. कारण —
      (१) आशिया खंडाशी व्यापार वाढवायचा होता.
      (२) कॉन्स्टँटिनोपल तुर्कांच्या ताब्यात गेल्याने आशियाशी व्यापार करण्याचा खुष्कीचा मार्ग बंद झाला होता.
      (३) नवीन व्यापारी जहाजे निर्माण झाली होती.

● ● ●

## १. मुघल सत्तेची स्थापना व विस्तार

इ. स. १५२६ ते १७०७ हा काळ भारतीय इतिहासामधील 'मुघल कालखंड' म्हणून ओळखला जातो. भारतात मुघल सत्तेची स्थापना झहिरुद्दीन मुहम्मद बाबर याने इ. स १५२६ मध्ये केली.

**बाबर** : बाबर हा मध्य आशियातील फरघाना या राज्याचा राजा होता. मध्य आशियातील सत्तास्पर्धेत त्याला आपल्या नातेवाइकांच्या तसेच उझबेगांच्या विरोधाला तोंड दयावे लागले. एके काळी तिमूरलगाची राजधानी असलेले समरकंद जिंकून घेण्याची बाबराची महत्त्वाकांक्षा होती. त्याने समरकंद बऱ्याचदा जिंकून घेतले व ते त्याच्या हातून गेलेही. एवढेच काय, सत्तास्पर्धेत त्याला आपले फरघानाचे राज्यही गमवावे लागले. मध्य आशियात साम्राज्यविस्तार करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा पूर्ण झाली नाही. मात्र त्याने भारताच्या वायव्य सीमेवरील काबूलचे राज्य जिंकून घेतले. त्याने कंदाहारही जिंकले.

काबूलमध्ये सत्ता स्थिर झाल्यावर त्याने भारताकडे दृष्टी वळवली. भारतातील संपत्तीचे त्याला आकर्षण होते. भारतातील अस्थिर राजकीय परिस्थिती त्याला अनुकूल होती दिल्लीवर त्या वेळी इब्राहीम लोदी राज्य करत होता त्याच्याविरुद्ध मदत करण्यासाठी पंजाबचा सुभेदार दौलतखान याने बाबराला भारतात बोलावले. त्यानुसार बाबर सैन्यानिशी भारतात आला इब्राहीम लोदी आणि बाबर याच्यात दिल्लीजवळ पानिपत येथे लढाई झाली. ही पानिपतची पहिली लढाई होय. २१ एप्रिल, १५२६ रोजी झालेल्या या लढाईत बाबराला विजय मिळाला. त्याने दिल्ली व आग्रा ही शहरेही काबीज केली व भारतात मुघल सत्तेची स्थापना केली

बाबर

बाबरास राजपुतांच्या तसेच अफगाणाच्या विरोधास तोड दयावे लागले. मेवाडचा

राणा सग याच्या नेतृत्वाखाली एकत्र आलेल्या राजपूत राजाचा बाबराने आग्र्याजवळील खानुवा येथे इ स. १५२७ मध्ये झालेल्या लढाईत पराभव केला. नतर त्याने पूर्व भारतातील अफगाण सरदाराचा विरोध मोडून काढला. त्यामुळे बाबराचे राज्य वायव्येस काबूल-कदाहारपासून पूर्वेस बिहारपर्यंत व उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस ग्वालियारपर्यंत पसरले. इ. स. १५३० मध्ये बाबराचा मृत्यू झाला

बाबर हा कुशल सेनापती होता. त्याचे प्रभावी नेतृत्व, शक्तिशाली तोफखाना, आणि त्याने केलेला घोडदळाचा कौशल्यपूर्ण वापर यांमुळे बाबराला भारतात यश मिळाले भारतात मैदानी युद्धात तोफखान्याचा वापर पहिल्यादा बाबराने केला.

बाबर हा प्रतिभाशाली लेखक व कवी होता त्याने आपल्या आठवणी लिहून ठेवलेल्या आहेत. त्या 'तुझुक-इ-बाबरी' या नावाने प्रसिद्ध आहेत. बाबर निसर्गप्रेमी व रसिक होता असे या आठवणीवरून दिसते.

**हुमायून** : बाबराच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा हुमायून गादीवर आला. नुकत्याच स्थापन झालेल्या मुघल सत्तेला स्थैर्य प्राप्त करून देण्याची जबाबदारी हुमायुनावर होती. अनेक अफगाण सरदार त्यांची सत्ता गेल्यामुळे मुघलाच्या विरुद्ध होते. त्याच्यापैकी शेरशाह सूर हा एक महत्त्वाकांक्षी व कर्तृत्ववान सरदार होता त्याने मुघलांविरुद्ध लढा सुरू केला. बगाल-बिहार या भागांत त्याने आपले वर्चस्व स्थापन केले त्याने इ स. १५४० मध्ये कनोज येथील लढाईत हुमायुनाचा पराभव केला. दिल्ली व आग्रा काबीज केले अशा रीतीने दिल्लीच्या राज्यावर अफगाणाची सत्ता पुन्हा प्रस्थापित झाली देशोधडीला लागलेल्या हुमायुनाने राजस्थान, सिंध येथे काही काळ भटकल्यानतर इराणमध्ये आश्रय घेतला

**शेरशाह सूर** · दिल्लीवर सत्ता प्रस्थापित केल्यानंतर शेरशाहाने राज्यविस्तारावर आपले लक्ष केंद्रित केले. अल्पावधीत पजाब, मुलतान, सिध, माळवा तसेच राजपुतान्याचा बराचसा मुलूख त्याने जिंकून घेतला. शेरशाहाचे राज्य पूर्वेला बंगालपासून पश्चिमेला सिंधू नदीपर्यंत पसरलेले होते. शेरशाहाने आपल्या पाच वर्षांच्या कारकिर्दीमध्ये राज्याचे प्रशासन कार्यक्षम केले राज्यात शांतता व सुव्यवस्था निर्माण केली. महसूलव्यवस्थेत महत्त्वाचे बदल केले लोककल्याणाकडे विशेष लक्ष पुरवले. राजधानीला जोडणारे हमरस्ते बांधले. रस्त्यांच्या दुतर्फा झाडे लावली.

वाटसरूंच्या सोईसाठी धर्मशाळा बांधल्या टपाल ने-आण करण्याची व्यवस्था केली. शेरशाहाने चलनव्यवस्थेत सुधारणा केली. रुपया हे नाणे त्यानेच सुरू केले.

**शेरशाहाचे नाणे : रुपया**

इ स १५४५ मध्ये बुंदेलखंडातील कालिंजरच्या लढाईत शेरशाहाचा अपघाती मृत्यू झाला. शेरशाहाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा इस्लामशाह गादीवर आला इस्लामशाहाच्या मृत्यूनंतर त्याच्या वारसदारामध्ये यादवी युद्ध सुरू झाले.

या सुमारास इराणच्या शाहाच्या मदतीने हुमायुनाने काबूल व कंदाहार जिंकून घेतले; लाहोर व दिल्ली ही शहरे हस्तगत केली आणि इस्लामशाहाच्या मृत्यूनंतर निर्माण झालेल्या राजकीय अस्थिरतेचा फायदा घेऊन इ स. १५५५ मध्ये भारतात मुघल सत्तेची पुनर्स्थापना केली. इ. स. १५५६ मध्ये हुमायुनाचा अपघाती मृत्यू झाला. यानंतर त्याचा मुलगा अकबर हा गादीवर आला. त्या वेळी तो अवघ्या तेरा वर्षांचा होता

**अकबर :** अकबर सत्तेवर आला त्या वेळी मुघल राज्य काबूल, कंदाहार, पंजाबचा काही प्रदेश, दिल्ली एवढ्या प्रदेशांपुरतेच मर्यादित होते. अकबराने आपल्या कारकिर्दीत मुघल राज्याचा विस्तार केला आणि त्याचा पाया भक्कम केला.

अकबराला पहिला संघर्ष अफगाणाशी करावा लागला. अफगाण राजा आदिलशाह सूर याचा सेनापती हेमू याने मुघल सत्तेला आव्हान दिले. त्याने दिल्ली व आग्रा जिंकून घेतले. परंतु इ. स १५५६ मध्ये अकबराने पानिपत येथे हेमूचा पराभव केला ही पानिपतची दुसरी लढाई होय

दिल्ली परत जिंकून घेतल्यानंतर अकबराने उत्तर भारतात मुघल सत्तेचा विस्तार

राणा प्रताप

केला त्याने सर्व पजाबावर आपली सत्ता प्रस्थापित केली मुलतान, गगा-यमुना याच्या-मधील दोआबाचा प्रदेश व माळवा हे प्रदेश जिकून घेतले मेवाड सोडून इतर राजपूत राज्ये जिकून घेतल्यावर अकबराने गुजरात, बगाल व उडीसा, तसेच पेशावर, काश्मीर, सिध हे प्रदेश जिंकून आपल्या राज्याला जोडले. मेवाडचा राजा राणा प्रताप याच्या प्रखर विरोधामुळे अकबराला सपूर्ण मेवाड जिकता आला नाही. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत प्राणपणाने लढून राणा प्रतापाने आपले स्वातत्र्य कायम राखले

दक्षिणेकडे मुघलांनी निजामशाहीची राजधानी अहमदनगरवर इ स १५९५ मध्ये हल्ला केला, तेव्हा अहमदनगरच्या राजघराण्यातील कर्तबगार स्त्री चादबिबी हिच्या नेतृत्वाखाली निजामशाही फौजानी प्रखर झुज दिली या वेळी झालेल्या तहानुसार निजामशाहाने वऱ्हाड प्रांत मुघलाना दिला. दोन वर्षांनतर मुघलानी पुन· अहमदनगरला वेढा दिला. या वेळी निजामशाहीतील दुहीतून चादबिबीचा खून झाला. अहमदनगरचा किल्ला व निजामशाहीतील काही प्रदेश मुघलाच्या ताब्यात आले

यानतर स्वत· अकबर मोठे सैन्य घेऊन दक्षिणेत आला इ स. १६०१ मध्ये त्याने खानदेश जिकून घेतला. याच वेळी शाहजादा सलीम याने बड पुकारल्यामुळे अकबर उत्तरेस परतला इ. स. १६०५ मध्ये सम्राट अकबराचा मृत्यू झाला.

चांदबिबी

सम्राट अकबराने भारतात एक विशाल साम्राज्य उभे केले. अकबराचे

The territorial waters of India extends into the sea to a distance of twelve nautical miles measured from the appropriate base line



साम्राज्य उत्तरेस काश्मीरपासून दक्षिणेला खानदेश-वऱ्हाडपर्यंत, पश्चिमेस सिंधपासून पूर्वेला बगाल, उडीसा येथपर्यंत पसरलेले होते. याशिवाय काबूल, कदाहार हे प्रदेशही त्याच्या साम्राज्यात मोडत होते

अकबर हा एक सुजाण आणि जागरूक शासक होता. त्याने भारतात एकछत्री अमल प्रस्थापित केला आणि कार्यक्षम प्रशासनव्यवस्था उभी केली. समाजातील अनिष्ट चालीना आळा घालण्याचा त्याने प्रयत्न केला. सती, बालहत्या यांसारख्या प्रथांना त्याने बंदी घातली. त्याने यात्राकर, जिझिया यांसारखे कर रद्द केले.

अकबराचे धार्मिक धोरण उदार व सहिष्णू होते सर्व धर्मांतील चागली तत्त्वे एकत्र करून अकबराने 'दीन-इ-इलाही' हा नवा धर्मपंथ स्थापन केला. मानवतावाद, एकेश्वरवाद आणि विश्वबंधुत्व या तत्त्वावर या पंथाची उभारणी झालेली होती. दीन-इ-इलाही हा एक विश्वधर्माचा प्रयोग होता. दीन-इ-इलाही स्वीकारण्याची सक्ती अकबराने कोणावरही केली नाही.

अकबर विद्याप्रेमी आणि कलाप्रेमी होता त्याचे स्वतःचे उत्तम ग्रंथालय होते. अकबराच्या दरबारात अनेक विद्वान व्यक्ती तसेच गुणी कलाकार होते अबुल फजल हा विद्वान पंडित व इतिहासकार होता. त्याने 'अकबरनामा' व 'ऐन-इ-अकबरी' हे ग्रंथ लिहिले. फैजी हा कवी व तत्त्वज्ञ होता. मानसिंग हा कुशल सेनानी तर तोडरमल कार्यक्षम प्रशासक होता. मुत्सद्देगिरी व चातुर्यासाठी बिरबल प्रसिद्ध होता तानसेन हा सगीतसम्राट होता. हुमाम हा निष्णात हकीम होता. मुल्ला दोप्याजा हा हजरजबाबी विद्वान होता. बदायुनी हा प्रसिद्ध इतिहासकार होता अकबराच्या या दरबाराला 'नवरत्न दरबार' असे म्हणतात. गुणग्राहकता, विशाल दृष्टी, मानवतावादी दृष्टिकोन इत्यादी गुणांमुळे अकबर हा एक महान राज्यकर्ता म्हणून इतिहासात प्रसिद्ध आहे

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) दौलतखान लोदीने बाबराला भारतात कशासाठी बोलावले ?

(आ) बाबराचे साम्राज्य कोठपर्यंत पसरले होते ?

(इ) अकबराने केलेली कोणतीही एक समाजसुधारणा सांगा.

२. कंसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा .

(अ) दिल्लीजवळ पानिपत येथे इ स. १५२६ मध्ये ------ आणि बाबर याच्यात लढाई झाली (सिकदर लोदी दौलतखान लोदी इब्राहीम लोदी)

(आ) शेरशाह सूर याने हुमायुनाचा पराभव करून दिल्लीच्या राज्यावर ------ सत्ता पुन्हा प्रस्थापित केली
(तुर्कांची, मगोलाची, अफगाणाची)

(इ) अकबरनामा हा ग्रथ ------ ने लिहिला.
(फैजी, अबुल फजल, बदायुनी)

(ई) अकबराच्या दरबारातील ------ हा मुत्सद्देगिरी व चातुर्यासाठी प्रसिद्ध होता.
(तोडरमल, बिरबल, मानसिंग)

३ योग्य त्या जोड्या लावा .

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) तोडरमल | (१) सगीतसम्राट |
| (आ) बदायुनी | (२) कुशल सेनानी |
| (इ) तानसेन | (३) थोर कवी |
| (ई) मानसिग | (४) इतिहासकार |
| | (५) प्रशासक |

४ पुढील प्रश्नाची पाच ते सहा वाक्यात उत्तरे द्या .

(अ) शेरशाह सूर याने केलेल्या सुधारणा सागा

(आ) दीन-इ-इलाही या धर्मपथाबद्दल माहिती द्या

● ● ●

# १०. मुघल सत्तेचा विस्तार
## इ. स. १६०५ ते १७०७

अकबराच्या मृत्यूनतर त्याचा मुलगा सलीम ऊर्फ जहागीर हा बादशाह झाला जहागिराला आपल्या कारकिर्दीच्या सुरुवातीस राजपुत्र खुसरो याच्या बंडाला तोड द्यावे लागले या बडामध्ये खुसरोला शिखाचे पाचवे गुरू गुरुअर्जुनदेव यानी मदत केली जहांगिराने खुसरोचे बड मोडून काढले आणि गुरुअर्जुनदेव याना मृत्युदडाची शिक्षा दिली व शिखांचा रोष ओढवून घेतला

जहागीर

आपल्या कारकिर्दीमध्ये जहांगिराने पूर्व बगालमध्ये मुघल सत्ता दृढ केली. पजाबमधील कागडा हा प्रदेश जिंकून घेतला दक्षिणेकडील राज्यविस्ताराचे अकबराचे धोरण त्याने पुढे चालू ठेवले जहागिराचा इ. स. १६२७ मध्ये मृत्यू झाला.

नूरजहान

जहागिराची न्यायप्रियतेबद्‌दल ख्याती होती. त्याच्या कारकिर्दीत सर्वसामान्य जनतेला बादशाहाकडे सहजपणे न्याय मागता येत असे.

जहागिराला साहित्य व कला यांची आवड होती. त्याने आपल्या आठवणी लिहून ठेवल्या आहेत. त्या 'तुझुक-इ-जहागिरी' या नावाने प्रसिद्‌ध आहेत जहांगिराच्या काळात चित्रकलेला बहर आला. त्याच्या दरबारी अबुल हसन, उस्ताद मन्सूर, मनोहर यांसारखे अनेक नामवत चित्रकार होते.

जहागिराची पत्नी नूरजहान हे भारताच्या इतिहासातील एक प्रभावी व्यक्तिमत्व आहे. जहागिराच्या राज्यकारभारात तिचा विशेष सहभाग होता. तिचे सुसस्कृत वागणे

शाहजहान

आणि तिची बुद्धिमत्ता याचा जहागिरावर प्रभाव होता. ती निसर्गप्रेमी व कलासक्त होती.

**शाहजहान :** जहागिराच्या मृत्यूनतर त्याचा मुलगा शाहजहान हा मुघल बादशाह झाला. त्याने दक्षिणेकडे मुघल सत्तेच्या विस्ताराचे धोरण चालू ठेवले. इ. स. १६३६ मध्ये आदिलशाहीच्या सहकार्याने निजामशाहीचा पाडाव करून त्याने बराचसा मुलूख आपल्या साम्राज्यास जोडला. आपल्या साम्राज्याची वायव्य सरहद्द सुरक्षित करण्यासाठी कदाहार व मध्य आशियातील बाल्ख व बदाक्शान हे प्रांत जिंकून घेण्याचा त्याने प्रयत्न केला; परतु त्यामध्ये त्याला अपयश आले.

इ स १६५७ मध्ये शाहजहान आजारी पडला त्यानतर त्याच्या मुलामध्ये वारसायुद्ध सुरू झाले. त्यात औरगजेब यशस्वी झाला त्याने शाहजहानला कैद केले व स्वत.स बादशाह म्हणून घोषित केले. पुढे आग्र्याच्या किल्ल्यात नजरकैदेत असतानाच शाहजहानचा इ. स. १६६६ मध्ये मृत्यू झाला शाहजहानच्या काळात वास्तुकला विशेष भरभराटीस आली.

**औरंगजेब :** इ. स १६५८ मध्ये औरगजेब बादशाह झाला त्या वेळी मुघल साम्राज्य हे उत्तरेस काश्मीरपासून दक्षिणेस अहमदनगरपर्यंत आणि वायव्येस काबूलपासून पूर्वेला बगालपर्यत पसरलेले होते. औरंगजेबाने आपल्या कारकिर्दीत या साम्राज्यात पूर्वेकडील आसाम, दक्षिणेतील विजापूर व गोवळकोड्याचा प्रदेश आणि महाराष्ट्राचा काही भाग या प्रदेशांची भर घातली. परिणामी मुघल सत्ता जवळ जवळ सर्व भारतभर पसरली.

औरंगजेब

औरंगजेबाला आपल्या कारकिर्दीत अनेक उठावाना तोंड द्यावे लागले. वायव्य सरहद्दीवरील पठाण हे स्वातंत्र्यप्रिय होते. त्याना आपले स्वतंत्र राज्य स्थापन करायचे होते. त्यांनी इ. स १६६७ मध्ये मुघल सत्तेविरुद्ध उठाव केला. त्याचा बीमोड करण्यासाठी मुघल सत्तेला सुमारे आठ वर्षे लढा द्यावा लागला. मथुरेच्या परिसरातील जाटानी इ स. १६६९ मध्ये बड केले. या बडाचे कारण प्रामुख्याने आर्थिक होते हे बंड मोडून काढण्यासाठी स्वत: बादशाहास जावे लागले. इ स. १६७२ मध्ये उत्तर भारतातील सत्नामी पथाच्या लोकांनी मुघल प्रशासकाच्या अरेरावीविरुद्ध बड पुकारले. बादशाहास हे बंड मोडून काढण्यासाठी आपला तोफखाना पाठवावा लागला.

**शिखांशी संघर्ष** : औरंगजेबाच्या कारकिर्दीच्या सुरुवातीला मुघल सत्ता व शीख यांचे संबंध सलोख्याचे होते. मुघलानी आसामात सुरू केलेल्या मोहिमेत शिखांचे नववे गुरू गुरुतेघबहाद्दर यांनी भागही घेतला होता. तेथून परत आल्यानतर औरंगजेबाच्या असहिष्णु धार्मिक धोरणाविरुद्ध मात्र त्यांनी नापसंती दर्शवली. औरंगजेबाने गुरुतेघबहाद्दराना कैद करून त्यांचा शिरच्छेद केला. गुरुतेघबहाद्दर यांच्या मृत्यूनंतर गुरुगोविंदसिंग हे शिखाचे गुरू झाले.

**गुरुगोविंदसिंग** : गुरुगोविंदसिंगांनी आपल्या अनुयायाना संघटित करून त्यांच्यातील लढाऊ वृत्तीला प्रोत्साहन दिले. गुरुगोविदसिग यांनी शीख समाजामध्ये एकजुटीची भावना रुजवली. लढाऊ शीख तरुणांना एकत्र करून त्यांचे एक दल उभे केले. त्यास 'खालसा दल' असे म्हणतात गुरुगोविदसिंगांनी शीख समाज शिस्तबद्ध व सघटित केला. त्यांनी हिमाचल प्रदेशातील पहाडी भागात शीख सत्ता दृढ केली आनदपूर हे त्याचे प्रमुख केंद्र होते

गुरुगोविंदसिग

पहाडी प्रदेशातील राजाशी गुरुगोविंदसिंगाचा संघर्ष सुरू झाला या सघर्षात तेथील राजांनी शीख सत्तेविरुद्ध औरगजेब बादशाहाकडे मदत मागितली. अशा रीतीने मुघल सत्ता व शीख याच्यात पुन्हा एकदा संघर्ष सुरू झाला. मुघल फौजानी आनंदपूरवर हल्ला चढवला त्या वेळी शिखानी प्रखर झुंज दिली. परंतु त्यांना यश आले नाही. त्यांची अपरिमित हानी झाली. यानंतर गुरुगोविंदसिंग दक्षिणेत आले असता इ स १७०८ मध्ये नांदेड मुक्कामी त्याच्यावर खुनी हल्ला झाला. पुढे त्यातच त्याचे निधन झाले.

**मराठ्यांशी संघर्ष** . महाराष्ट्रात शिवाजीमहाराजाच्या नेतृत्वाखाली स्वराज्य निर्माण झाले होते. त्याची माहिती आपण पुढे घेणार आहोत शिवाजीमहाराजाच्या मृत्यूनतर सारी दक्षिण जिंकून घेण्याच्या हेतूने औरगजेब बादशाह इ स. १६८२ मध्ये दक्षिण भारतात आला. त्याने मराठ्यांविरुद्ध मोहीम हाती घेतली. मराठ्यांनी औरगजेबाबरोबर तीव्र संघर्ष केला दक्षिणेतील आपल्या पंचवीस वर्षाच्या वास्तव्यात औरगजेबाने मराठ्याची सत्ता नेस्तनाबूत करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु मराठ्यांनी बादशाहाला प्रखर प्रतिकार करून आपले स्वातंत्र्य टिकवून ठेवले. मराठ्याशी लढा चालू असताना फेब्रुवारी, १७०७ मध्ये अहमदनगर येथे औरगजेब बादशाहाचा मृत्यू झाला.

**औरंगजेबानंतरचे मुघल बादशाह** : औरगजेबानतर त्याचा मुलगा पहिला बहादूरशाह हा गादीवर आला त्याची कारकीर्द अल्पकालीन ठरली. त्यानंतरचे मुघल बादशाह कर्तृत्वहीन निघाले इ. स १७३९ मध्ये इराणचा बादशाह नादिरशाह याने दिल्लीवर आक्रमण केले. त्याने अनेक लोकांची कत्तल केली. मुघल बादशाहास कैद केले. सपत्तीची प्रचड लूट केली. त्यामध्ये रत्नजडित मयूर सिहासन व कोहिनूर हिरा याचाही समावेश होता. अफगाण राजा अहमदशाह अब्दाली याने भारतावर अनेक आक्रमणे केली. या आक्रमणामुळे मुघल सत्ता खिळखिळी झाली व इ स. १७६१ नंतर ती केवळ नाममात्र उरली.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) 'खालसा दल' कशास म्हणतात ?

(आ) औरंगजेब बादशाह इ. स. १६८२ मध्ये दक्षिण भारतात का आला ?

(इ) 'तुझुक-इ-जहांगिरी' या ग्रंथाचा विषय कोणता ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) गुरुतेघबहाद्दर हे शिखांचे ------ गुरू होते.
(आठवे, नववे, दहावे)

(आ) जहांगिराला आपल्या कारकिर्दीच्या सुरुवातीसच ------ याच्या बंडाला तोंड द्यावे लागले
(राजपुत्र खुसरो, शाहजहान, औरंगजेब)

३. कारणे द्या :

(अ) वायव्य सरहद्दीवरील पठाणांनी मुघल सत्तेविरुद्ध उठाव केला

(आ) शाहजहानने कंदाहार, बाल्ख व बदाक्शान हे प्रांत जिंकून घेण्याचा प्रयत्न केला

४. गुरुगोविंदसिंग यांच्या कार्याची चार ते पाच वाक्यात माहिती सांगा

मुघलकालीन नाणी

## ११. मुघल शासनव्यवस्था

मुघल साम्राज्य विस्तृत होते साम्राज्याचा राज्यकारभार चालवण्यासाठी मुघल बादशाहानी कार्यक्षम प्रशासनव्यवस्था उभी केली.

**केंद्रीय प्रशासन** : मुघल बादशाह हा राज्याचा प्रमुख होता. बादशाहाची सत्ता अनियंत्रित होती तो लष्करी व मुलकी बाबतीत सर्वोच्च सत्ताधारी होता. बादशाहास राज्यकारभारात मदत करण्यासाठी प्रधान व अधिकारी असत त्यांची नेमणूक बादशाह करत असे.

'वजीर' किवा 'दिवाण' हा मुख्य प्रधान असून सर्व खात्यावर तो सर्वसाधारण नियत्रण ठेवत असे. दिवाण या नात्याने तो साम्राज्याचा आर्थिक व्यवहार पाहत असे. 'मीरबक्षी' हा लष्करी खात्याचा प्रधान होता. सैन्यभरती, सैन्याचे प्रशिक्षण, सैनिकाना शस्त्रास्त्रे पुरवणे, सैन्याला पगार देणे इत्यादी कामे त्याच्या खात्याकडे होती. 'खान-इ-सामान' याच्याकडे शाही घराण्याचा कारभार पाहण्याचे काम असे. 'सदर-उस्-सुदूर' याच्याकडे धर्माविषयीचे खाते होते. 'काझी-उल्-कझात' हा सरन्यायाधीश होता.

**प्रांतिक प्रशासन** : प्रशासनाच्या सोईकरता मुघल साम्राज्याचे अनेक विभाग पाडले होते. प्रत्येक विभागास 'सुभा' असे म्हणत सुभ्याची विभागणी अनेक उपविभागामध्ये केलेली असे त्यास 'सरकार' असे म्हणत. प्रत्येक सरकाराची विभागणी 'परगणा' या घटकात केलेली असे अनेक खेड्यांचा मिळून एक परगणा होत असे. 'खेडे' हा सर्वात लहान प्रशासकीय घटक होता.

सुभ्याच्या प्रमुखास 'सिपह-सालार' अथवा 'सुभेदार' म्हणत असत. सुभेदारास सुभ्याच्या प्रशासनात मदत करण्यासाठी अनेक अधिकारी असत दिवाण, बक्षी, सदर, काझी, कोतवाल हे त्यापैकी काही प्रमुख अधिकारी होते. सुभ्यांमध्ये ज्या नगराचा अतर्भाव होत असे, त्या प्रत्येक नगरावर 'कोतवाल' हा प्रमुख अधिकारी असे. नगराची व्यवस्था पाहणे, नागरिकांचे रक्षण करणे, बाजारपेठेवर नियंत्रण ठेवणे इत्यादी कामे तो करत असे सरकार या विभागाच्या कारभाराची जबाबदारी 'फौजदार' या प्रमुख अधिकाऱ्याकडे असे परगण्याचा कारभार 'शिकदार' हा अधिकारी पाहत असे, तर खेड्याचा कारभार 'मुकादम' पाहत असे त्याच्या मदतीला

'पटवारी' हा अधिकारी असे.

**न्यायव्यवस्था :** मुघल बादशाह स्वतः न्यायदान करत असे. 'काझी-उल्-कझात' हा बादशाहास न्यायदानात मदत करत असे. सुभा, सरकार, परगणा व खेडे या प्रशासकीय विभागामध्ये न्यायदानाचे काम त्या त्या विभागाचे सर्वोच्च अधिकारी करत. या कामात त्याना मदत करण्यासाठी 'काझी' हा अधिकारी असे. याशिवाय न्यायदानाचे काम त्या त्या प्रदेशातील पचायतीसारख्या पारपरिक सस्थामार्फतही होत असे.

**जमीनमहसूल :** मुघलांची जमीनमहसूलव्यवस्था बऱ्याच अंशी शेरशाहाच्या जमीनमहसूल पद्धतीवर आधारलेली होती.

शेरशाहाने जमिनीच्या मोजणीसाठी दोरखडाचा उपयोग केला. लागवडीयोग्य जमिनीची मोजणी केली. जमिनीच्या सुपीकतेनुसार जमिनीची उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशी प्रतवारी केली व त्यावरून सारा निश्चित केला. शेरशाहाच्या काळात साऱ्याचा दर उत्पन्नाच्या एक-तृतीयाश एवढा होता.

अकबराने राजा तोडरमल याच्या साहाय्याने जमीनमहसूल पद्धत अधिक कार्यक्षम केली. जमीनमोजणीसाठी दोरखडाऐवजी लोखंडी कड्यानी जोडलेल्या ठरावीक लाबीच्या बाबूचा वापर करण्यात येऊ लागला मुघल साम्राज्यात सर्वसाधारणपणे साऱ्याचा दर उत्पन्नाच्या एक-तृतीयाश एवढा होता परंतु औरगजेबाच्या काळात तो वाढवून उत्पन्नाच्या एक-द्वितीयाश एवढा झाला जमीन-महसूल रोख आणि धान्य स्वरूपात गोळा केला जात असे. मुकादम, आमील, अमीन, फौजदार इत्यादी अधिकाऱ्याकडे महसूल गोळा करण्याचे काम सोपवलेले होते.

**लष्करी प्रशासन :** मन्सबदारी पद्धत हे मुघल लष्करी प्रशासनाचे वैशिष्ट्य होते. मन्सबदारी पद्धत अकबराने सुरू केली. 'मन्सब' या शब्दाचा अर्थ 'हुद्दा' किंवा 'श्रेणी' असा आहे अकबराच्या काळात दहा सैनिकाच्या तुकडीपासून ते सात हजार सैनिकांची तुकडी बाळगणारे विविध हुद्द्याचे मन्सबदार असत. मन्सबदारास या सैनिकाच्या खर्चासाठी बादशाहाकडून काही जमीन दिली जात असे. मन्सबदारास लष्करी कामाबरोबर काही प्रशासकीय जबाबदाऱ्याही पार पाडाव्या लागत. अधिकाऱ्याना मिळणारी मन्सब वंशपरपरेने नसे.

अकबराच्या काळात मन्सबदारी पद्धत कार्यक्षमतेने राबवली गेली. परंतु पुढे मन्सबदारांची संख्या खूपच वाढली व या पद्धतीत अनेक दोष शिरले.

मुघलाच्या लष्करात पायदळ, घोडदळ, तोफखाना हे प्रमुख विभाग होते. तोफखाना हा मुघल लष्कराचा महत्त्वाचा विभाग होता. 'दरोगा-इ-तोफखाना' या अधिकाऱ्याकडे तोफखाना विभागाची जबाबदारी होती. 'दरोगा-इ-डाकचौकी' याच्याकडे हेरखाते व टपालव्यवस्थेवरील देखरेखीचे काम होते.

मुघल प्रशासनव्यवस्था ही प्रामुख्याने अकबर बादशहाने निर्माण केलेली होती. मुघल सत्तेच्या विघटनास सुरुवात होईपर्यंत ती बऱ्याच अंशी टिकून राहिली.

**स्वाध्याय**

१. कसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) अकबराने जमीनमहसूल पद्धती ------- च्या साहाय्याने अधिक कार्यक्षम केली (शेरशाह, तोडरमल, मानसिंग)

(आ) मुघल काळात ------- पद्धत हे लष्करी प्रशासनाचे वैशिष्ट्य होते (देशमुखी, वतनदारी, मन्सबदारी)

(इ) मुघल लष्करात ------- हा महत्त्वाचा विभाग होता. (टपालखाते, हेरखाते, तोफखाना)

२ योग्य त्या जोड्या लावा .

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) वजीर | (१) सरन्यायाधीश |
| (आ) मीरबक्षी | (२) सर्व खात्यावर नियंत्रण |
| (इ) काझी-उल्-कझात | (३) हेरखाते व टपाल |
| (ई) दरोगा-इ-डाकचौकी | (४) तोफखाना विभाग |
| | (५) लष्करी खात्याचा प्रधान |

३. पुढील प्रश्नाची तीन ते चार वाक्यात उत्तरे द्या :

(अ) कोतवाल हा अधिकारी कोणती कामे करत असे ?

(आ) शेरशाहाच्या जमीनमहसूल पद्धतीबद्दल माहिती सांगा

(इ) मुघल काळातील न्यायव्यवस्थेची माहिती द्या.

(ई) मन्सबदारी पद्धतीविषयी माहिती सागा

● ● ●

## १२. मुघल साम्राज्याचा ऱ्हास

मुघल साम्राज्याच्या विघटनास अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात सुरुवात झाली अठराव्या शतकाच्या अखेरीस तर मुघल साम्राज्य केवळ नाममात्र उरले मुघल साम्राज्याचा ऱ्हास का झाला, हे आपण या पाठात पाहणार आहोत

**राजकीय व लष्करी कारणे :** मुघल साम्राज्य हे बादशाहाच्या वैयक्तिक कर्तृत्वावर आधारलेले होते. औरंगजेबानंतरचे बादशाह साम्राज्यास खंबीर व प्रभावी नेतृत्व देऊ शकले नाहीत याचा फायदा घेऊन प्रांतिक सुभेदार आपापल्या भागात प्रबळ बनले अयोध्या, बगाल, हैदराबाद येथील सुभेदारानी स्वत.ची राज्ये स्थापन केली. यामुळे अठराव्या शतकात मुघल साम्राज्याच्या ऱ्हासाला सुरुवात झाली

मन्सबदारी पद्धत हा मुघल लष्कराचा कणा होता अठराव्या शतकात मन्सबदारी पद्धतीत अनेक दोष शिरले. मन्सबदारांना सम्राटाविषयी वाटणारी निष्ठा कमी झाली. मन्सबदार स्वार्थी बनू लागले ते भ्रष्टाचार करू लागले आपल्या पदरी असलेल्या सैनिकाचा उपयोग ते स्वत.चे बळ वाढवण्यासाठी करू लागले. त्यामुळे मुघल सम्राटाचे लष्करी सामर्थ्य कमी झाले. नादिरशाह, अहमदशाह अब्दाली यासारख्या आक्रमकापासून साम्राज्याचे रक्षण करण्यास मुघल बादशाह असमर्थ ठरले. त्यामुळे मुघल साम्राज्याची प्रतिष्ठा धुळीला मिळाली. परिणामी लोकाची साम्राज्यावरील निष्ठा कमी झाली.

**आर्थिक कारणे :** मुघल साम्राज्याचा विस्तार ज्या प्रमाणात झाला होता त्या प्रमाणात साम्राज्याचा खर्चही वाढला होता. मन्सबदारांची सख्या वाढली. लष्कर व प्रशासनावरील खर्च वाढला. युद्धे व दुष्काळ यामुळे शेतीचे उत्पन्न घटले. परिणामी अठराव्या शतकात मुघल साम्राज्याची आर्थिक परिस्थिती ढासळू लागली.

मध्यवर्ती सत्तेची दुर्बलता आणि राजकीय अस्थिरता यांमुळे अठराव्या शतकात मुघल बादशाहांना उद्योगधद्यांच्या व व्यापाराच्या वाढीकडे विशेष लक्ष देता आले नाही. त्यामुळे साम्राज्याचे जकात, अबकारी कर इत्यादीपासून मिळणारे उत्पन्न घटले. याशिवाय ठिकठिकाणची बडे, सतत चालणारी युद्धे, सरदार-उमरावांची विलासी राहणी यांमुळे साम्राज्याची अर्थव्यवस्था ढासळली.

**औरंगजेब बादशाहाची धोरणे :** मुघल साम्राज्यात अनेक जाती-जमातीचे व

धर्म-पंथांचे लोक होते. अकबराने सामंजस्याचे व सहिष्णुतेचे धोरण स्वीकारले होते. त्यामुळे समाजात एकोपा निर्माण होण्यास मदत झाली व साम्राज्य मजबूत झाले. औरंगजेबाच्या असहिष्णु व सनातनी धोरणामुळे समाजातील एकोप्याच्या भावनेला तडा गेला. जिझिया व यात्राकर यांसारखे जाचक कर औरंगजेब बादशाहाने मुस्लिमेतरांवर लादले. त्यामुळे साम्राज्यातील राजपूत, जाट, शीख यांसारखे घटक दुखावले गेले. मुघल साम्राज्याचे आधारस्तंभ असलेल्या राजपुतांना त्याने दुखावल्यामुळे त्यांचे सहकार्य त्यास मिळू शकले नाही व साम्राज्य कमकुवत बनले.

औरंगजेब बादशाह कर्तृत्ववान असला तरी त्याच्या स्वभावात काही दोष होते. त्याचा आपल्या कोणत्याही अधिकाऱ्यावर विश्वास नव्हता. साम्राज्याची सर्व सूत्रे त्याने आपल्या हातात केंद्रित केली होती. राज्यकारभाराच्या बारीकसारीक गोष्टीतही त्याने प्रमाणाबाहेर हस्तक्षेप केल्यामुळे त्याचे अधिकारी निष्क्रिय होऊ लागले.

औरंगजेबाने सतत पंचवीस वर्षे मराठ्यांशी युद्ध केले. या युद्धात मुघल साम्राज्याची प्रचंड वित्तहानी आणि जीवितहानी झाली. त्याचबरोबर बादशाहाच्या दक्षिणेतील दीर्घ काळ वास्तव्यामुळे उत्तरेतील प्रशासनव्यवस्थेवरील त्याचे नियंत्रण कमी झाले. त्यामुळे एकछत्री अंमल खिळखिळा होऊन साम्राज्याच्या विघटनास सुरुवात झाली.

बादशाहांचा दुर्बलपणा, सरदार-उमरावांची वाढती फुटीर वृत्ती, साम्राज्याची बिघडलेली अर्थव्यवस्था, प्रजेची वाढती उदासीनता, औरंगजेबाची फसलेली धोरणे इत्यादी अनेक कारणांमुळे मुघल साम्राज्याच्या ऱ्हासास सुरुवात झाली. अठराव्या शतकात प्रभावी झालेल्या मराठी सत्तेला, त्याचप्रमाणे प्रबळ होत चाललेल्या ईस्ट इंडिया कंपनीला पायबंद घालणे मुघल सत्ताधीशाना जमले नाही. सुरुवातीस ते मराठ्यांच्या हातातील व नंतर इंग्रजांच्या हातातील बाहुले बनले आणि या प्रबळ साम्राज्याचा ऱ्हास झाला.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) अठराव्या शतकात मुघल बादशाहांना व्यापाराच्या वाढीकडे लक्ष का देता आले नाही ?

(आ) औरंगजेबाचे अधिकारी निष्क्रिय का होऊ लागले ?

२ रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा ·

(अ) अयोध्या, बंगाल व हैदराबाद येथील सुभेदारानी -------- स्थापन केली

(आ) प्रबळ होत चाललेल्या -------- पायबंद घालणे मुघल सत्ताधीशाना जमले नाही

३. पुढील प्रश्नाची तीन ते चार वाक्यात उत्तरे लिहा ·

(अ) अठराव्या शतकात मन्सबदारी पद्धतीमध्ये कोणते दोष निर्माण झाले ?

(आ) मुघल साम्राज्याची आर्थिक परिस्थिती का ढासळू लागली ?

(इ) औरंगजेबाच्या कोणत्या धोरणामुळे मुघल सत्ता कमकुवत बनली ?

(ई) औरंगजेबाने मराठ्याशी दीर्घ काळ चालवलेल्या लढ्याचा मुघल साम्राज्यावर कोणता परिणाम झाला ?

४ मुघल साम्राज्याच्या ऱ्हासाची कोणतीही दोन कारणे सागा

● ● ●

# १३. आर्थिक व सामाजिक जीवन
## इ. स. १५०० ते १७५०

मुघल काळात भारताच्या आर्थिक व सामाजिक जीवनात अनेक वैशिष्ट्यपूर्ण बदल घडून आले

**आर्थिक जीवन** : भारतीय समाज हा मुघल काळातही कृषिप्रधान होता. शेती हा येथील प्रमुख व्यवसाय होता. मुघल काळात शेतकरी परंपरागत पिकांबरोबर काही नवी पिके घेऊ लागले. तंबाखू आणि मका, तसेच बटाटा व मिरची याची लागवड नव्याने सुरू झाली

मुघल राज्यकर्त्यांनी शेतीला उत्तेजन दिले शेतसारा पद्धतीमध्ये सुधारणा केल्या. शेतीचे उत्पादन वाढवण्यासाठी अधिक जमीन लागवडीखाली आणण्याचे प्रयत्न केले गेले. वेळप्रसंगी शेतकऱ्यांना बी-बियाणे व शेतीची अवजारे खरेदी करण्यासाठी सरकारतर्फे तगाई दिली जात असे

शेतीखेरीज इतरही व्यवसाय रूढ होते सतराव्या शतकात कापड उद्योग विशेष

गुजरातमध्ये तयार झालेल्या कापडाचा एक नमुना

भरभराटीस आला होता या काळात गुजरात, बंगाल, उडीसा हे प्रांत कापडनिर्मितीसाठी विशेष प्रसिद्ध होते याशिवाय रेशमी कापडउत्पादनासाठी आग्रा,

पटना , खंबायत, पैठण इत्यादी ठिकाणे प्रसिद्ध होती रग तयार करणे, विविध प्रकारचे धातुकाम करणे, जहाजबांधणी यांसारखे उद्योगधदेही मुघल काळात भरभराटीला आलेले होते

**चांदीच्या भाड्यावरील नक्षीकाम**

मुघल राज्यकर्त्यानी आग्रा ते गोवळकोडा, सुरत, कासीमबझार, काबूल असे अनेक हमरस्ते बांधून वाहतुकीची सोय केली. त्याचप्रमाणे प्रवाशाच्या विश्रातीसाठी 'सराया' म्हणजे धर्मशाळा बाधल्या.

मुघल बादशाहानी मुबलक प्रमाणात नाणी पाडली. त्यामुळे व्यापाऱ्याना पुरेसे चलन उपलब्ध झाले मुघल काळात चांदीचा रुपया हे नाणे भारतभर प्रमाणभूत मानले जाई. या काळात सुरत, भरूच, कोचीन, हुगळी इत्यादी बदराची वाढ झाली त्याचप्रमाणे आग्रा, बऱ्हाणपूर, विजापूर, विजयनगर इत्यादी नगरे भरभराटीस आली. वाहतुकीची साधने, चलनाची उपलब्धता, बदरांचा व नगराचा विकास या सर्व गोष्टीमुळे सतराव्या शतकात भारताचा अतर्गत व आतरराष्ट्रीय व्यापार वाढीस लागला

**व्यापार :** धान्य, कापूस, विविध प्रकारचे कापड, मीठ, शिसे, सुगंधी द्रव्ये इत्यादी वस्तूचा व्यापार देशामध्ये चालत असे. मालाची वाहतूक करण्यासाठी घोडे, बैल, उट, गाढवे, बैलगाड्या याचा वापर केला जाई

आशिया आणि युरोप खंडातील विविध देशांशी भारताचा व्यापार चालत असे. भारतातून मुख्यतः मसाल्याचे पदार्थ, अफू, कापड, काष्ठौषधी, नीळ इत्यादी गोष्टीची निर्यात होत असे. सोने, चांदी, तांबे, कथील, जस्त, पारा इत्यादी गोष्टीची भारतात आयात होत असे. अठराव्या शतकात मात्र केद्रीय सत्तेचा दुर्बलपणा आणि जागोजागी उद्‌भवलेली बंडे यांमुळे व्यापार मदावला.

**समाजजीवन :** मुघलकालीन भारतीय समाजात आर्थिकदृष्ट्या सर्वसाधारणपणे तीन वर्ग होते. पहिला वर्ग हा राजघराण्यातील लोक, अमीर-उमराव, जमीनदार, मन्सबदार इत्यादी धनिकांचा होता. दुसऱ्या वर्गात प्रशासनातील दुय्यम अधिकारी, व्यापारी, छोटे वतनदार इत्यादीचा अतर्भाव होत असे शेतकरी, कारागीर, शेतमजूर इत्यादी लोक तिसऱ्या वर्गात मोडत. त्यांचे राहणीमान निकृष्ट प्रतीचे होते पहिल्या व दुसऱ्या वर्गाचे वास्तव्य सर्वसामान्यपणे नगरांमध्ये असे, तर तिसऱ्या वर्गाचे वास्तव्य खेड्यामध्ये असे.

तत्कालीन भारतीय समाजावर अंधश्रद्‌धेचा पगडा होता समाजातील अधश्रद्‌धा दूर न होण्यास तत्कालीन शिक्षणपद्‌धती मुख्यतः जबाबदार होती. हिंदूच्या पाठशाळा आणि मुसलमानाच्या मदरसा या शिक्षण देणाऱ्या प्रमुख संस्था होत्या. हिदू समाजात शिक्षणाचा हक्क फक्त उच्चवर्णीयानाच होता बहुसख्य समाज शिक्षणापासून वचित होता अभ्यासाचे विषय पारपरिक होते बहुताश शिक्षण धार्मिक स्वरूपाचे होते. शिक्षणामध्ये नवीन आशय, नवीन विचार नव्हता या काळात पारंपरिक ज्ञानशाखांतही प्रगती झाली नाही. राजकारण, अर्थकारण, नवीन वैज्ञानिक शोध याविषयी समाजात उदासीनता होती जनजीवनात रूढी-परपराना अनन्यसाधारण महत्त्व होते. कर्मकांडांचे व आचारधर्माचे स्तोम वाढले होते. समाज हा स्थितिशील बनला होता

सर्वसामान्य स्त्रिया सामाजिक दास्यात होत्या त्यांना शिक्षणाचा तसेच धार्मिक विधी करण्याचाही अधिकार नव्हता. नवजात बालिकाची हत्या, बालविवाह, पडदा-पद्‌धती, सती अशा अनेक अनिष्ट प्रथा समाजात प्रचलित होत्या. सर्वसाधारण

स्त्रियांची स्थिती अशी हलाखीची असली तरी राणी दुर्गावती, चादबिबी, नूरजहान, जिजाबाई, ताराबाई, संत बहिणाबाई यांसारख्या काही कर्तृत्ववान स्त्रिया या काळात होऊन गेल्या.

अन्न, पेहराव, खेळ, कला, स्थापत्य, संगीत अशा कितीतरी गोष्टींमध्ये भारतीयांची येथे स्थायिक झालेल्या तुर्क, इराणी, अफगाण, मुघल इत्यादी समाजघटकांशी देवाण-घेवाण झाली. सरबत हे मध्य आशियातील पेय, तसेच जिलेबी हे मिष्टान्न भारतात लोकप्रिय झाले. सलवार-कमीज, कुडता-पायजमा हे तेथील पोशाख भारतात रूढ झाले. पोलो हा जगप्रसिद्ध खेळ मुघलांनी भारतात आणला.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :
   (अ) कापडनिर्मितीसाठी कोणते प्रांत विशेष प्रसिद्ध होते ?
   (आ) मुघल राज्यकर्त्यांनी वाहतुकीच्या सोईसाठी काय केले ?
   (इ) मुघल काळात व्यापारी वाहतुकीसाठी कोणती साधने वापरत ?
   (ई) कोणत्या लोकांचे वास्तव्य नगरात असे ?

२. कंसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :
   (अ) मुघल काळात --------- यांची लागवड नव्याने सुरू झाली.
   (गहू आणि भात, तंबाखू आणि मका, कापूस आणि बाजरी)
   (आ) समाजातील अंधश्रद्धा दूर न होण्यास तत्कालीन --------- जबाबदार होती.
   (प्रशासनपद्धती, शिक्षणपद्धती, लष्करी व्यवस्था)
   (इ) पोलो हा खेळ --------- भारतात आणला
   (तुर्की सत्ताधीशांनी, मुघलांनी, सुलतानांनी)

३. पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यात उत्तरे लिहा :
   (अ) शेती उत्पादन वाढवण्यासाठी मुघल काळात कोणते उपाय योजण्यात आले ?
   (आ) सतराव्या शतकात भारताचा व्यापार वाढीस का लागला ?

४. उपक्रम :
   मुघलकालीन भारतातील सांस्कृतिक देवाण-घेवाण याचा तक्ता तयार करा

● ● ●

## १४. कला आणि वाङ्मय
## इ. स. १५०० ते १७५०

भारतीय कलेच्या इतिहासात मुघल काळ हा विशेष उल्लेखनीय आहे वास्तुकला, चित्रकला, संगीत इत्यादी कला, तसेच साहित्य या क्षेत्रात या काळात मोलाची भर पडली

**वास्तुकला** : मुघल काळात भारतीय वास्तुकलेत नेत्रदीपक प्रगती झाली. पारपरिक भारतीय कला आणि इराणी कला यांचा सुरेख सगम मुघलकालीन वास्तुकलेमध्ये झालेला आढळतो. इमारतीची प्रमाणबद्धता तसेच भव्यता व नाजूकपणा याचा समन्वय, त्याचप्रमाणे वास्तूभोवतालची विस्तीर्ण उद्याने ही त्या काळातील वास्तुरचनेची वैशिष्ट्ये होत. उंच चौथऱ्यावर बाधलेली इमारत, इमारतीसाठी वापरलेला लाल अथवा सगमरवरी दगड, कोरीव पाना-फुलांनी सुशोभित केलेल्या सगमरवरी कमानी, इमारतीतील नक्षीदार दगडी जाळ्या आणि वास्तूवरील दुहेरी घुमट ही मुघलकालीन वास्तूची आणखी काही वैशिष्ट्ये आहेत

दिल्ली येथे असलेली हुमायुनाची कबर व आग्र्याजवळील फत्तेपूर सिक्री येथील इमारती या अकबराच्या काळातील उल्लेखनीय वास्तू आहेत. हुमायुनाची कबर ही भव्य वास्तू लाल दगडात बांधलेली असून तिचा घुमट सगमरवरी आहे

**शेख सलीम चिश्ती याची कबर**

अकबराने फतेपूर सिक्री हे नवीन शहर वसवले येथील इमारतींपैकी राणी जोधाबाईचा महाल, बुलंद दरवाजा, बिरबलाचा महाल, शेख सलीम चिश्तीची कबर, जामा मशीद, दिवाण-इ-खास, दिवाण-इ-आम या वास्तू विशेष उल्लेखनीय आहेत शेख सलीम चिश्तीची कबर शुभ्र सगमरवरात बांधलेली असून त्यावरील जाळीकाम अप्रतिम आहे बुलंद दरवाजा हा भव्यतेसाठी प्रसिद्ध आहे

शाहजहानच्या काळात शुभ्र संगमरवरी दगडाचा वापर वास्तू बाधण्यासाठी मोठ्या प्रमाणावर केला गेला संगमरवरी दगडांमुळे कोरीव काम करणे सोपे झाले.

ताजमहाल

मुमताजमहल या आपल्या पत्नीच्या स्मरणार्थ शाहजहानने आग्रा येथे 'ताजमहाल' ही वास्तू बाधली. ही वास्तू भव्य असली, तरी अत्यंत साधी, नाजूक व सौदर्यपूर्ण आहे. वास्तूच्या आतील जाळीकाम विलोभनीय आहे सगमरवरी भिंतीवर पाना-फुलांचे नक्षीकाम असून ते रत्नजडित आहे वास्तूभोवती विस्तीर्ण बाग आहे. रम्य अशा परिसरात बांधलेला ताजमहाल ही जगातील एक सुदर वास्तू आहे.

दिल्लीचा लाल किल्ला

शाहजहानने दिल्ली येथे बाधलेला किल्ला 'लाल किल्ला' म्हणून प्रसिद्ध आहे. या किल्ल्यातील दिवाण-इ-आम, दिवाण-इ-खास ही दालने विशेष प्रसिद्ध आहेत. आजही आपण आपले राष्ट्रीय उत्सव या किल्ल्याच्या परिसरात साजरे करतो.

**चित्रकला :** मुघलांच्या दरबारी अनेक विख्यात भारतीय व इराणी चित्रकार होते. भारतीय चित्रकार हे व्यक्तीची हुबेहूब चित्रे काढण्यात कुशल होते, तर इराणी चित्रकार निसर्गचित्रे काढण्यात कुशल होते. अकबराच्या काळात या दोन्ही शैलीचा समन्वय होऊन मुघल चित्रशैली उदयास आली.

जहांगिराच्या काळात मुघल चित्रशैली विशेष बहरास आली. विषयानुरूप स्वतंत्र चित्रे काढून घेण्यावर जहांगिराने भर दिला पशुपक्ष्यांची व फुलांची अनेक चित्रे त्याने काढून घेतली. त्यात केवळ गुलाबपुष्पाच्या दीडशेहून अधिक जातीची चित्रे होती. जहांगिराच्या काळात निसर्गचित्रणाला महत्त्वाचे स्थान मिळाले. या निसर्गचित्रशैलीचा प्रभाव पुढील काळातील कांगडा चित्रशैलीवर दिसून येतो.

या काळातच राजपूत चित्रशैलीचा स्वतंत्रपणे उदय झाला. राजपूत चित्रशैलीतील विषयांवर संतकाव्याचा प्रभाव आढळतो. राजपूत चित्रशैलीचे विषय लोकजीवनाशी संबंधित होते. राजपूत शैलीतील अनेक चित्रे भिंतीवर काढलेली असत.

मुघल बादशाह हे कलेचे भोक्ते तसेच निसर्गप्रेमीही होते. त्यांनी विस्तीर्ण बागा

तयार केल्या. त्यापैकी काश्मीरमधील शालीमार बाग, निशात बाग या आजही प्रसिद्ध आहेत.

**संगीत** : पंडित हरिदास, तानसेन, बैजू बावरा यांसारखे विख्यात गायक अकबराच्या काळात होऊन गेले. हिंदुस्थानी संगीत व कर्नाटक सगीत या दोन सगीतशैली मुघल काळात रूढ झाल्या. पुढील काळात लोकप्रिय झालेले ठुमरीसारखे सगीतप्रकार मुघल काळात उदयास आले. पुरदरदास, त्यागराज यांचे कर्नाटक संगीतातील योगदान उल्लेखनीय आहे

**वाङ्मय** : या काळात सस्कृत, फारसी त्याचप्रमाणे प्रादेशिक भाषांमध्ये विपुल प्रमाणात साहित्यनिर्मिती झाली.

**संस्कृत आणि फारसी साहित्य** : जगन्नाथ पडिताचे 'गंगालहरी', कवीद्र परमानंदाचे 'शिवभारत', वेंकटाध्वरी याचे 'विश्वगुणादर्शचंपू' असे उल्लेखनीय संस्कृत ग्रंथ या काळात लिहिले गेले. त्याचप्रमाणे अथर्ववेद, उपनिषदे, रामायण, महाभारत, भगवद्गीता, लीलावती इत्यादी ग्रंथांची फारसीमध्ये भाषांतरे झाली. शाहजहानचा मुलगा दारा शुकोह हा संस्कृत पंडित होता. त्याने उपनिषदांचे फारसीमध्ये भाषांतर केले.

बाबराने लिहिलेला 'तुझुक-इ-बाबरी' हा ग्रंथ तुर्की भाषेतील एक उत्कृष्ट ग्रथ आहे. बाबराची कन्या गुलबदन बेगम हिने लिहिलेला 'हुमायूननामा' हा चरित्र-ग्रंथ प्रसिद्ध आहे. अबुल फजल याने लिहिलेले 'अकबरनामा' व 'ऐन-इ-अकबरी' हे त्या काळाबद्दल माहिती देणारे फारसी भाषेतील ग्रथ आहेत.

**हिंदी साहित्य** : या काळात हिंदीमध्ये लिहिले गेलेले संत तुलसीदासांचे 'रामचरितमानस' हे काव्य आजही लोकप्रिय आहे. सूरदास यांचे 'सूरसागर' हे काव्य कृष्णभक्तीवर आधारलेले आहे. मलीक महंमद जायसी या कवीचे 'पद्मावत' हे काव्य हिंदीमधील अभिजात काव्य म्हणून मानले जाते. उस्मान या कवीने 'चित्रावली', तर नूर महंमद याने 'इंद्रावती' ही काव्ये लिहिली.

**मराठी साहित्य** : या काळात सत एकनाथांनी मराठीत 'भागवत' हा ग्रंथ लिहिला. भारुडे आणि गौळणी हे त्यांनी लिहिलेले काव्यप्रकार विशेष प्रसिद्ध आहेत. मुक्तेश्वराने महाभारतातील काही भागांचे ओवीबद्ध भाषांतर केले. सत तुकारामाचे अभंग आजही महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यात म्हटले जातात. संत रामदासांच्या

'दासबोधा'त उपदेशपर श्लोक आहेत. कृष्णाजी अनंत सभासद याने शिवाजीमहाराजांचे चरित्र लिहिले. इंग्रज ख्रिस्ती धर्मोपदेशक थॉमस स्टिफन्स याने मराठीमध्ये 'क्रिस्तपुराण' हा येशू ख्रिस्तांच्या जीवनावरील ग्रंथ लिहिला या कालखंडात इतर प्रादेशिक भाषामध्येही साहित्यनिर्मिती झाली.

**उर्दू साहित्य :** याच काळात उर्दू भाषेचा विकास झाला. दख्खनी उर्दूमध्ये शाह मिरांजी याने 'खुशनामा' हा काव्यग्रंथ लिहिला. नुस्रती याला उर्दू भाषेतील महाकवी म्हटले जाते. 'तारिखे इस्कंदरी' हा त्याचा महत्त्वाचा ऐतिहासिक ग्रंथ आहे. या ग्रंथामध्ये महाराष्ट्रातील किल्ले व निसर्ग यांचे अपूर्व वर्णन आहे.

कला व साहित्याच्या क्षेत्रात मुघल काळात मोलाची भर पडली. पारपरिक भारतीय कलेवर मध्य व पश्चिम आशियाई शैलीचा परिणाम झाला. या परस्पर समन्वयातून भारतीय सस्कृती समृद्ध झाली.

बुलद दरवाजा

## स्वाध्याय

१ प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या .

(अ) भारतीय चित्रकार कोणत्या प्रकारची चित्रे काढण्यात कुशल होते ?

(आ) अकबराच्या काळातील विख्यात गायक कोणते ?

(इ) सत एकनाथाचे कोणते काव्यप्रकार विशेष प्रसिद्ध आहेत ?

२ कसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा

(अ) शुभ्र सगमरवरी दगडाचा वास्तुकामासाठी मोठ्या प्रमाणावर उपयोग ------ च्या काळात केला गेला
(अकबर, जहागीर, शाहजहान)

(आ) मुघल चित्रशैली ------ काळात विशेष बहरास आली
(बाबराच्या, जहागिराच्या, हुमायुनाच्या)

(इ) मुघल काळात काश्मीरमध्ये तयार केलेली ------- बाग प्रसिद्ध आहे
(गुलाबांची, जस्मिन, शालीमार)

(ई) मुघल काळात -------- हा लोकप्रिय संगीतप्रकार उदयाला आला
(ठुमरी, कर्नाटक सगीत, गझल)

३ योग्य त्या जोड्या लावा :

| | ग्रथ | | ग्रथकार |
|---|---|---|---|
| (अ) | गगालहरी | (१) | महमद जायसी |
| (आ) | रामचरितमानस | (२) | जगन्नाथ पंडित |
| (इ) | पद्मावत | (३) | थॉमस स्टिफन्स |
| (ई) | क्रिस्तपुराण | (४) | सत तुलसीदास |
| (उ) | तारिखे इस्कदरी | (५) | कवींद्र परमानंद |
| | | (६) | नुसती |

४. पुढील प्रश्नाची चार ते पाच वाक्यांत उत्तरे द्या :

(अ) मुघलकालीन वास्तुकलेची वैशिष्ट्ये सांगा

(आ) फत्तेपूर सिक्री येथील इमारतीची माहिती सागा.

(इ) राजपूत चित्रशैलीची वैशिष्ट्ये सागा

५. उपक्रम :

मुघलकालीन वास्तूंच्या चित्राचा सग्रह करा

● ● ●

# १५. शिवपूर्वकालीन महाराष्ट्र

सतराव्या शतकाच्या सुरुवातीस महाराष्ट्रातील बहुताश प्रदेश अहमदनगरचा निजामशाह आणि विजापूरचा आदिलशाह यांच्या ताब्यात होता. कोकणच्या किनारपट्टीवर सिद्दी आणि पोर्तुगीज या सागरी सत्ता होत्या या सर्व सत्तामध्ये सतत चालणाऱ्या सघर्षामुळे महाराष्ट्रात अस्थिरता व असुरक्षितता होती

**महाराष्ट्रातील प्रशासन** : आपले प्रशासन चालवण्यासाठी निजामशाह आणि आदिलशाह हे स्थानिक लोकाची मदत घेत किल्लेदार, हिशोबनीस, कारकून अशा अनेक पदावर त्यानी मराठी माणसाच्या नेमणुका केल्या. मराठी सरदार आणि सैनिक याना लष्करात मोठ्या प्रमाणात स्थान दिले. मराठी सरदाराना जहागिरी दिल्या.

लष्करी सेवेतील प्राबल्य व प्रशासनातील वाढते महत्त्व यामुळे मराठी सरदार प्रबळ बनू लागले. अशा सरदारापैकी मोरे, घाटगे, निंबाळकर, जाधव, घोरपडे, सावंत, भोसले इत्यादी घराणी सोळाव्या व सतराव्या शतकात विशेष प्रसिद्धीस आली

या काळात जमीनमहसूल गोळा करण्याचे काम देशमुख, देशपांडे या परपरागत अधिकाऱ्याकडे होते. हे प्रशासकीय काम करण्याबद्दल त्याना सारा माफ असलेली जमीन दिलेली असे. अशा जमिनीस 'वतन' असे म्हणत आणि वतन मिळालेल्या अधिकाऱ्यास 'वतनदार' असे म्हणत. आपल्या अधिकाराखालील प्रदेशात शातता व सुव्यवस्था राखण्याचे कामही या वतनदारांकडे असे. त्यासाठी ते थोडाबहुत फौजफाटा बाळगत. पदरी फौजफाटा असल्यामुळे वतनदार शिरजोर बनत व प्रसंगी राजाची सत्ताही जुमानत नसत ते ठरल्यापेक्षा जास्त महसूल जबरदस्तीने वसूल करून रयतेचे शोषण करत

**समाजस्थिती** : सत्ताधारी वर्ग आणि सर्वसामान्य जनता हे तत्कालीन महाराष्ट्रातील समाजामध्ये दोन प्रमुख वर्ग होते. सत्ताधारी वर्गात राजा, जहागीरदार, वतनदार इत्यादींचा समावेश होता. शेती हा सामान्य जनतेचा मुख्य व्यवसाय होता, भारतातील इतर सुपीक प्रदेशाच्या तुलनेने महाराष्ट्रातील जमिनीची उत्पादनक्षमता कमी असल्याने शेतीतून मिळणारे उत्पन्नही कमीच असे बहुतेक

शेती ही पावसावर अवलबून असल्याने उत्पन्नाची शाश्वती नसे शेतकऱ्यांना वारवार दुष्काळाना तोड द्यावे लागे. राज्यकर्त्यांकडून जनतेची पिळवणूक होत असे. नैसर्गिक संकटे व राज्यकर्त्यांचे जुलूम यांना तोड देताना जनता त्रस्त झाली होती.

**संतांचे कार्य :** अंधश्रद्धा व कर्मकाड यांचा समाजावर जबरदस्त पगडा होता. लोक दैववादाच्या आहारी गेले होते. त्याची प्रयत्नशीलता थडावली होती स्त्रिया आणि दलित यांची स्थिती तर फारच हलाखीची होती अशा परिस्थितीत समाजात चैतन्य निर्माण करण्याचे प्रयत्न महाराष्ट्रातील संतांनी केले. महाराष्ट्रात चक्रधर, नामदेव, ज्ञानेश्वर याच्यापासून सुरू झालेली संतपरपरा समाजाच्या विविध स्तरांतून आलेल्या संतानी पुढे चालवली. त्यांनी लोकांच्या मनात आपली सस्कृती, आपली भाषा, आपला प्रदेश यांच्याविषयी अभिमान निर्माण केला. लोकांना मानवतेचा संदेश दिला. सत ज्ञानेश्वरांनी ज्ञान आणि भक्ती यांचा समन्वय साधला. संत नामदेवानी निरर्थक कर्मकांडावर टीका केली सत एकनाथांनी कर्मठपणास विरोध केला. स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पनांवर कोरडे ओढले संत तुकारामानी अधश्रद्धा व बुवाबाजी यावर हल्ले चढवले. रामदासस्वामींनी संघटना व बलोपासना याचे महत्त्व लोकांना पटवून दिले. 'मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्र धर्म वाढवावा' हा सदेश त्यानी दिला

सतांच्या या कार्यामुळे महाराष्ट्रातील लोकांमध्ये आत्मविश्वास निर्माण झाला.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) प्रशासन चालवण्यासाठी निजामशाह आणि आदिलशाह कोणाची मदत घेत ?

(आ) 'वतन' म्हणजे काय ?

(इ) वतनदार रयतेचे शोषण कसे करत ?

(ई) महाराष्ट्रात इतर प्रदेशांच्या तुलनेने शेतीउत्पन्न कमी का असे ?

(उ) संतांनी लोकांच्या मनात कोणत्या गोष्टींविषयी अभिमान निर्माण केला ?

(ऊ) सत रामदासांनी कोणता संदेश दिला ?

२. रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा :

(अ) लष्करी सेवेतील प्राबल्य व ----------- वाढते महत्त्व यामुळे मराठी सरदार प्रबळ बनू लागले.

(आ) सत एकनाथानी ---- विरोध केला.

(इ) संत तुकाराम यांनी ---- व ---- यांवर हल्ले चढवले

३. पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यांत उत्तरे द्या :

(अ) मराठी जनता का त्रस्त झाली होती ?

(आ) सताचे कार्य सागा.

४. उपक्रम :

(अ) मराठी सतमंडळातील मिळतील तेवढ्या सताची चित्रे मिळवा आणि त्याखाली मोजक्या शब्दांत त्याचा संदेश लिहा

(आ) सत एकनाथाचे भारूड मिळवा व त्याचा अर्थ समजून घ्या ते वर्गाच्या सांस्कृतिक कार्यक्रमात साभिनय सादर करा

● ● ●

## १६. स्वराज्यस्थापना

शके १५५१, फाल्गुन वद्य तृतीयेस म्हणजेच १९ फेब्रुवारी, १६३० रोजी जुन्नरजवळील शिवनेरी या किल्ल्यावर शिवाजीमहाराजाचा जन्म झाला

शिवाजीमहाराजांचे वडील शहाजीराजे भोसले हे दक्षिणेतील एक मातब्बर सरदार होते. अहमदनगरच्या निजामशाहीचे ते एक आधारस्तंभ होते. सन १६३२ मध्ये मुघलांनी निजामशाही जिंकून घेण्यासाठी मोहीम सुरू केली. या मोहिमेत विजापूरच्या आदिलशाहाने मुघलाशी सहकार्य केले शहाजीराजानी त्यांना प्रखर विरोध करून निजामशाही वाचवण्याचा प्रयत्न केला. परंतु मुघल व आदिलशाही सामर्थ्यापुढे त्यांचा निभाव लागला नाही इ स १६३६ मध्ये निजामशाहीचा पाडाव होऊन ती नष्ट झाली.

त्यानंतर शहाजीराजे आदिलशाहीचे सरदार झाले. आदिलशाहाने पुणे, सुपे, चाकण, इंदापूर या भागांची जहागीर शहाजीराजांना दिली शहाजीराजाना आदिलशाहाने कर्नाटकात कामगिरीवर पाठवले. त्यांना कर्नाटकात बंगळूर व त्याच्या आसपासचा प्रदेश जहागीर म्हणून दिला

इ स. १६४१ च्या सुमारास शहाजीराजांनी पुण्याच्या जहागिरीचा कारभार शिवाजीराजे आणि शिवाजीराजाची आई जिजाबाई यांच्याकडे सोपवला. त्यांच्यासोबत दादाजी कोंडदेव हा अनुभवी आणि स्वामिनिष्ठ कारभारी दिला

दादाजी कोंडदेवांनी पुण्याच्या जहागिरीत शांतता व सुव्यवस्था निर्माण केली, चोख कारभार सुरू केला व जहागिरीची संपन्नता वाढवली

जिजाबाईंनी शिवाजीराजावर बालपणापासूनच स्वातंत्र्यप्रेमाचे आणि सदाचरणाचे संस्कार केले. स्वराज्यस्थापनेच्या कार्यास त्यानी सतत प्रोत्साहन दिले जहागिरीचा कारभार आणि न्यायनिवाडा यांचे प्राथमिक धडे शिवाजीराजाना दादाजीकडून मिळाले.

जहागिरीचा कारभार करताना रयतेवर अन्याय होणार नाही याची शिवाजीराजांनी खबरदारी घेतली. जहागिरीतील बहुताश प्रजा शेतकरी वर्गातील होती. महाराजानी शेतीला उत्तेजन दिले. शेतकऱ्यावर जुलूम-जबरदस्ती करणाऱ्या वतनदारांना त्यांनी शिक्षा केल्या वतनदारांच्या बेजबाबदार व मनमानी कारभाराला

लोक कटाळले होते याउलट शिवाजीराजे याचा कारभार लोकाभिमुख होता त्यामुळे शिवाजीराजाविषयी लोकांच्या मनात विश्वासाची आणि आपलेपणाची भावना निर्माण झाली दादाजी नरसप्रभू, येसाजी कंक, तानाजी मालुसरे, सूर्याजी मालुसरे, जिवा महाला, बाजी पासलकर यासारखे अनेक सहकारी शिवाजीराजाना मिळाले. लोकांच्या विश्वासाच्या आणि सहकार्याच्या बळावर शिवाजीराजे यांनी स्वराज्यस्थापनेचे कार्य हाती घेतले.

शिवाजीमहाराजांनी स्वराज्यस्थापनेची सुरुवात मावळ भागात केली. मावळचा प्रदेश डोंगराळ, दऱ्याखोऱ्याचा आणि दुर्गम होता. मावळच्या या भौगोलिक परिस्थितीचा उपयोग महाराजांनी स्वराज्यस्थापनेसाठी करून घेतला. लोकाच्या मदतीने शिवाजीमहाराजांनी या भागात स्वराज्याच्या स्थापनेस सुरुवात केली.

स्वराज्यस्थापनेमागील महाराजांचे ध्येय त्याच्या तत्कालीन मुद्रेवरून स्पष्ट होते. मुद्रा म्हणजे कागदपत्रावर शिक्कामोर्तब करण्यासाठी वापरायचा शिक्का.

**शिवाजीमहाराजांची राजमुद्रा**

महाराजाच्या मुद्रेवर पुढील संस्कृत ओळी कोरलेल्या आहेत:

प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥

शहाजीचा पुत्र शिवाजी याचे प्रतिपदेच्या चंद्रकोरीप्रमाणे वाढत जाणारे हे राज्य लोकाच्या कल्याणासाठी आहे, अशी ग्वाही महाराजानी या मुद्रेतून लोकांना दिली

**स्वराज्यस्थापनेच्या हालचाली :** शिवाजीमहाराजाच्या जहागिरीतील किल्ले आदिलशाहाच्या ताब्यात होते किल्ला ताब्यात असला तर आजूबाजूच्या प्रदेशावर नियंत्रण ठेवता येई, किल्ल्याच्या आश्रयाने आपल्या प्रदेशाचे रक्षण करता येई, म्हणून शिवाजीमहाराजानी जहागिरीतील किल्ले आपल्या ताब्यात घेण्याचे ठरवले. त्यांनी 'साम-दाम-दंड-भेद' या नीतीचा वापर करून मुरुबदेव, तोरणा, कोंढाणा, पुरंदर हे किल्ले ताब्यात घेतले आणि स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवली. मुरुबदेव किल्ल्याची डागडुजी करून त्यानी त्या गडाचे नाव राजगड असे ठेवले.

स्वराज्यनिर्मितीच्या या कार्याला महाराष्ट्रातील काही आदिलशाही वतनदार-जहागीरदारानी विरोध केला आदिलशाहाने दिलेली वतने व हक्क या वतनदाराना स्वराज्यापेक्षा अधिक प्रिय होती. शिवाजीमहाराजाना विरोध करणाऱ्यामध्ये जावळीचे मोरे, सुप्याचे मोहिते, मुधोळचे घोरपडे, वाडीचे सावंत इत्यादी सरदाराचा समावेश होता त्याचा बदोबस्त करणे स्वराज्यस्थापनेसाठी आवश्यक होते.

**जावळीचा ताबा :** सातारा जिल्ह्यात वायव्येस असलेल्या जावळीचा मुलूख हा लष्करीदृष्ट्या मोक्याचा होता कोकण भागात स्वराज्याचा विस्तार करण्यासाठी तो महत्वाचा होता तेथील चद्रराव मोरे याचा शिवाजीमहाराजाना विरोध होता. शिवाजीमहाराजानी सुरुवातीला मोऱ्याशी सामोपचाराचे धोरण अवलबले, परंतु स्वराज्यास असलेला मोऱ्याचा विरोध चालूच राहिला. तेव्हा इ. स. १६५६ मध्ये शिवाजीमहाराजानी जावळीवर स्वारी करून तो प्रदेश जिंकून घेतला. मोऱ्यांचा पाडाव झाल्यामुळे स्वराज्याच्या विरोधकाना चागलीच जरब बसली.

जावळीच्या विजयामुळे स्वराज्याचा विस्तार झाला रायरीचा अभेद्य किल्ला शिवाजीमहाराजाच्या ताब्यात आला. हाच तो रायगड किल्ला जावळीच्या खोऱ्यात शिवाजीमहाराजांनी प्रतापगड हा किल्ला बांधला जावळीची प्रचंड सपत्ती शिवाजीमहाराजांच्या हाती पडली. अशा रीतीने जावळीच्या विजयाने शिवाजीमहाराजाचे सामर्थ्य सर्वप्रकारे वाढले. याप्रमाणेच महाराजानी मोहिते, सावत इत्यादी सरदारांचाही बदोबस्त केला. आदिलशाहीशी उघड सामना करण्यास महाराज आता सिद्ध झाले.

**अफजलखानाचे पारिपत्य :** जावळीच्या विजयानतर शिवाजीमहाराजानी

आदिलशाहीच्या ताब्यातील कोकण किनारपट्टीवरील कल्याण व भिवडी ही ठिकाणे जिकून घेतली महाराजांच्या या चढाईच्या धोरणामुळे आदिलशाही दरबारात खळबळ उडाली. शिवाजीमहाराजाचा बदोबस्त करण्यासाठी अफजलखान या बलाढ्य व अनुभवी सरदाराची निवड करण्यात आली. इ. स. १६५९ मध्ये मोठ्या फौजेनिशी अफजलखान स्वराज्यावर चालून आला अफजलखानाची स्वारी म्हणजे स्वराज्यावरील मोठे संकट होते. जावळीच्या दुर्गम प्रदेशात शिवाजीमहाराजानी अत्यत धैर्याने या संकटाला तोड दिले प्रतापगडाच्या पायथ्याशी अफजलखान आणि शिवाजीमहाराज याची भेट ठरली. या प्रसंगी झालेल्या भेटीत अफजलखानाने महाराजांस दगाफटका करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा महाराजानी त्यास ठार केले व वाई येथे त्याच्या सैन्याची धूळधाण उडवली या पराभवाने आदिलशाहीस मोठा धक्का बसला

**सिद्दी जौहराचा पन्हाळगडाला वेढा** : यानंतर थोड्याच दिवसांत शिवाजीमहाराजांनी आदिलशाहाचा कोल्हापूरजवळील पन्हाळा हा मोक्याचा किल्ला जिंकून घेतला. तेव्हा आदिलशाहाने इ स. १६६० मध्ये सिद्दी जौहर या मातब्बर सेनानीला मोठ्या फौजेनिशी शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध पाठवले. त्याने पन्हाळगडाला वेढा दिला. शिवाजीमहाराज वेढ्यात अडकले. त्यानी सुमारे पाच महिने किल्ला निकराने लढवला. सिद्दी मागे हटण्याची चिन्हे दिसेनात अखेर शिवाजीमहाराजानी मुत्सद्देगिरीचा डाव टाकून त्याच्याशी सलोख्याची बोलणी सुरू केली. त्यामुळे सिद्दी व त्याचे सैन्य बेसावध राहिले. याचा फायदा घेऊन शिवाजीमहाराज वेढ्यातून निसटून विशाळगडाकडे निघाले. सिद्दी जौहराच्या सैन्याने महाराजाचा पाठलाग केला. या वेळी शिवाजीमहाराजाचा सरदार बाजीप्रभू देशपांडे याने घोडखिडीत सिद्दी जौहराच्या सैन्यास रोखून धरले. शिवाजीमहाराज विशाळगडास सुखरूप पोहोचले. या लढाईत बाजीप्रभूला वीरमरण आले.

शिवाजीमहाराज पन्हाळ्याच्या वेढ्यात अडकले असतानाच मुघलांनी स्वराज्यावर स्वारी केली. शिवाजीमहाराज दुहेरी सकटात सापडले. एकाच वेळी आदिलशाह व मुघल या दोन सत्ताशी लढणे कठीण होते मुघलांच्या स्वारीचे संकट अधिक गभीर होते. त्यामुळे महाराजानी आदिलशाहाशी तह केला. या तहानुसार पन्हाळगड आदिलशाहाला परत देण्यात आला.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या ·

(अ) आदिलशाहाने शहाजीराजांना कोणता प्रदेश जहागीर म्हणून दिला ?

(आ) शिवाजीराजांबद्दल जनतेच्या मनात विश्वासाची भावना का निर्माण झाली ?

(इ) शिवाजीमहाराजाच्या काही सहकाऱ्याची नावे लिहा

(ई) मावळातील कोणत्या भौगोलिक परिस्थितीचा शिवाजीराजानी स्वराज्यस्थापनेच्या कार्यात उपयोग करून घेतला ?

२. कसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) निजामशाहीचा ------ मध्ये पाडाव होऊन ती नष्ट झाली.
(इ. स १६३२, इ. स. १६२७, इ. स १६३६)

(आ) जावळीच्या विजयामुळे ------ चा किल्ला शिवाजीमहाराजाच्या ताब्यात आला
(शिवनेरी, रायरी, पुरदर)

३. योग्य त्या जोड्या लावा

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) दादाजी कोंडदेव | (१) घोडखिंडीत वीरमरण |
| (आ) सिद्दी जौहर | (२) पुणे जहागिरीचे कारभारी |
| (इ) बाजीप्रभू देशपाडे | (३) पन्हाळगडाला वेढा |
| | (४) सुपे परगण्याचे सरदार |

४ पुढील प्रश्नाची चार ते पाच वाक्यात उत्तरे द्या :

(अ) शिवाजीमहाराजाच्या राजमुद्रेवरील सस्कृत ओळीचा अर्थ सागा

(आ) शिवाजीमहाराजानी जहागिरीतील किल्ले ताब्यात घेण्याचे का ठरवले ?

(इ) मोरे, घोरपडे, सावत इत्यादी आदिलशाही वतनदाराचा बदोबस्त करणे शिवाजीमहाराजाना का आवश्यक वाटले ?

(ई) जावळीच्या विजयाचे महत्त्व सागा

५. उपक्रम .

राजमुद्रेच्या चित्रात राजमुद्रेवरील वचनाचा अर्थ मराठीतून कलात्मकरित्या बसवा.

● ● ●

## १७. मुघलांशी संघर्ष

आदिलशाहीशी सुमारे पधरा वर्षे सघर्ष करून शिवाजीमहाराजानी स्वराज्य निर्माण केले. ते टिकवण्यासाठी त्यांना सामना करावा लागला तो मुघल सत्तेशी

इ. स. १६५८ मध्ये औरगजेब मुघल साम्राज्याचा बादशाह झाला त्याने आपला मामा शायिस्तेखान यास दक्षिणेचा सुभेदार नेमले. दक्षिणेत आल्याबरोबर त्याने शिवाजीमहाराजाच्या हालचालीना पायबंद घालण्याचे ठरवले. शिवाजीमहाराज पन्हाळगडावर अडकले असताना शायिस्तेखानाने चाकण, पुणे, सुपे इत्यादी स्वराज्याचे प्रांत जिकून घेतले. मे, १६६० मध्ये शायिस्तेखानाने पुण्यातील 'लालमहाल' या शिवाजीमहाराजांच्या वाड्यात आपला तळ ठोकला. मुघल फौजांनी पुण्याच्या आसपासचा प्रदेश उद्ध्वस्त करण्यास सुरुवात केली शायिस्तेखानाला पुण्यातून घालवण्यासाठी शिवाजीमहाराजांनी एक धाडसी बेत आखला. निवडक सैनिक बरोबर घेऊन ५ एप्रिल, १६६३ रोजी शिवाजीमहाराजानी रात्रीच्या वेळी लालमहालात शिरून खानावर हल्ला केला हल्ल्यात खान निसटला, पण त्याच्या हाताची बोटे तुटली.

या हल्ल्यामुळे खानाची मोठी मानहानी झाली. त्याने पुणे सोडले व आपला मुक्काम औरंगाबादला हालवला

**सुरतेवर हल्ला :** मुघल फौजानी स्वराज्याचे मोठे नुकसान केले होते प्रदेश उद्ध्वस्त करून तो उजाड केला होता. महाराजांना हे नुकसान भरून काढायचे होते सुरत त्या वेळी भारतातील सर्वांत मोठे आंतरराष्ट्रीय व्यापाराचे केंद्र व श्रीमत शहर होते. मुघलांच्या या शहरावर हल्ला करून बादशाहाच्या प्रतिष्ठेला धक्का देण्याची शिवाजीमहाराजांची योजना होती. इ. स. १६६४ मध्ये सुरतेवर हल्ला करून शिवाजीमहाराजांनी प्रचड सपत्ती मिळवली. शिवाजीमहाराजाच्या या हल्ल्यामुळे बादशाहाला जबर धक्का बसला.

शायिस्तेखानावरील हल्ला व सुरतेची लूट यामुळे औरंगजेब बादशाह सतप्त झाला. शिवाजीमहाराजाचा पुरता बीमोड करण्यासाठी बादशाहाने मिर्झा राजा जयसिग आणि दिलेरखान याना बरोबर प्रचंड फौज देऊन पाठवले. जयसिंग राजकारण व युद्धकौशल्य यात निपुण होता

**पुरंदरचा वेढा व मुघलांशी तह :** फेब्रुवारी, १६६५ मध्ये औरंगाबाद येथे आल्यावर जयसिंगाने शिवाजीमहाराजांचा बंदोबस्त करण्यासाठी व्यापक योजना आखली. शिवाजीमहाराजांना कोणाचीही मदत मिळू नये अशी व्यवस्था केली त्यामुळे शिवाजीमहाराज एकाकी पडले. स्वराज्याचा प्रदेश हस्तगत करण्यासाठी जयसिंगाने सर्वत्र लष्कर पाठवले. दिलेरखानाने पुरंदरला वेढा घातला शिवाजीमहाराजांचा स्वामिनिष्ठ सरदार मुरारबाजी पुरंदरचा किल्ला लढवताना धारातीर्थी पडला प्रचंड मुघल फौजेला तोंड देताना मराठ्यांची अवस्था बिकट होऊ लागली. प्रदेश उजाड व बेचिराख झाल्याने लोकांची दुर्दशा होऊ लागली मुघलांच्या लष्करी सामर्थ्यापुढे आपला निभाव लागणार नाही हे महाराजांनी ओळखले. आपल्या सैनिकांची प्राणहानी व प्रदेशाचे नुकसान टाळण्यासाठी जयसिंगाशी तह करण्याचा व्यवहार्य निर्णय त्यांनी घेतला व जून, १६६५ मध्ये पुरंदरचा तह घडून आला. या तहानुसार शिवाजीमहाराजांनी बादशाहाला आपले तेवीस किल्ले व त्यांच्या भोवतालचा चार लाख होन वार्षिक उत्पन्नाचा प्रदेश दिला आदिलशाहीविरुद्ध मुघलांना मदत करण्याचे आश्वासनही दिले

**आग्रा भेट :** पुरंदरच्या तहानंतर जयसिंगाने आदिलशाहाविरुद्ध मोहीम काढली. तहात ठरल्याप्रमाणे शिवाजीमहाराजांनी जयसिंगास साहाय्य केले, परंतु आदिलशाही सैन्याविरुद्ध जयसिंगाला अपयश आले. आदिलशाह, कुतुबशाह व शिवाजीमहाराज या तिन्ही सत्ता मुघलांच्या विरुद्ध एकत्र आल्या, तर मुघलांच्या दक्षिणेच्या धोरणास फार मोठा शह बसेल हे जयसिंगाने ओळखले होते. अशा परिस्थितीत महाराजांना काही काळ तरी दक्षिणेच्या राजकारणापासून दूर ठेवले पाहिजे हे जयसिंग व औरंगजेब बादशाह यांना पटले. तेव्हा महाराजांनी बादशाहाच्या भेटीस आग्रा येथे जावे असा प्रस्ताव जयसिंगाने महाराजांपुढे ठेवला. स्वत त्याने महाराजांच्या सुरक्षिततेची हमी घेतली आग्र्यास जाऊन बादशाहाशी दक्षिणेच्या राजकारणाविषयी प्रत्यक्ष वाटाघाटी करण्याची कल्पना महाराजांनाही पटली असावी. महाराजांनी आग्र्यास जाण्यास संमती दिली.

५ मार्च, १६६६ रोजी शिवाजीमहाराज बादशाहाच्या भेटीसाठी आग्र्यास निघाले बरोबर राजपुत्र संभाजी, निवडक अधिकारी व सैनिक होते १२ मे रोजी बादशाहाचा पन्नासावा वाढदिवस होता त्याच दिवशी भेट ठरली होती. महाराज आग्र्यास

पोहोचल्यानतर जयसिंगाचा मुलगा रामसिंग त्याना बादशहाच्या भेटीसाठी दरबारात घेऊन गेला बादशाहा आपला योग्य सन्मान करील अशी शिवाजीमहाराजाची अपेक्षा होती; परतु दरबारात बादशाहाने त्याची विशेष दखल घेतली नाही त्याना पाचहजारी सरदाराच्या रागेत उभे करण्यात आले या अपमानामुळे महाराज सतप्त झाले व दरबारातून निघून गेले तेव्हा बादशाहाने शिवाजीमहाराजाना नजरकैद केले. थोड्याच दिवसानी महाराज मोठ्या शिताफीने कैदेतून निसटले व १२ सप्टेबर, १६६६ रोजी महाराष्ट्रात सुखरूप येऊन पोहोचले. महाराजानी आग्ऱ्याहून येताना संभाजीला मथुरेला सुरक्षित ठेवले होते. काही काळाने संभाजीही महाराष्ट्रात सुखरूप येऊन पोहोचला.

**मुघलांविरूद्ध आक्रमक पवित्रा** : आग्ऱ्याहून सुटून आल्यानंतर शिवाजीमहाराजाची सुमारे चार वर्षे स्वराज्याची घडी बसवण्यात गेली मुघलांच्या ताब्यात गेलेले आपले किल्ले व प्रदेश परत जिकून घेण्यासाठी त्यानी इ स. १६७० मध्ये चढाईचे धोरण स्वीकारले. त्यानी कोढाणा, पुरंदर, माहुली, लोहगड, कर्नाळा, रोहिडा, अहिवंत, मार्कडा, साल्हेर इत्यादी किल्ले जिकून घेतले. सुरतेवर दुसऱ्यादा हल्ला करून बरीच संपत्ती आणली. वणी-दिडोरीच्या लढाईत मुघलाना पराभूत केले. वऱ्हाड, खानदेश व बागलाण या मुघल प्रदेशावर स्वाऱ्या केल्या 'चहू महिन्यात सत्तावीस गड घेतले. मोठी ख्याती केली' या शब्दात कृष्णाजी अनत सभासद या बखरकाराने महाराजांच्या पराक्रमाचे वर्णन केले आहे महाराजाच्या या आक्रमक मोहिमेत तानाजी मालुसरे, मोरोपत पिगळे, प्रतापराव गुजर इत्यादींनी मोलाची कामगिरी केली याच काळात आदिलशाही मुलखावर स्वारी करून शिवाजीमहाराजानी पन्हाळा, परळी (सज्जनगड) व सातारचा किल्ला हे किल्ले जिकले.

**राज्याभिषेक** : सतत तीस वर्षाच्या अविश्रात परिश्रमातून मराठ्यांचे स्वराज्य साकार झाले होते स्वतंत्र आणि सार्वभौम राज्य म्हणून त्यास सर्वमान्यता मिळणे आणि त्याची विधिपूर्वक घोषणा करणे आता आवश्यक होते. म्हणून शिवाजीमहाराजांनी राज्याभिषेक करून घेण्याचे ठरवले ६ जून, १६७४ रोजी विद्‌वान पडित गागाभट्ट याच्या हस्ते रायगडावर महाराजांचा राज्याभिषेक झाला सार्वभौमत्वाचे प्रतीक म्हणून 'राज्याभिषेक शक' ही नवीन कालगणना सुरू करण्यात

होन

आली. महाराज शककर्ते झाले. राज्याभिषेकप्रसंगी 'श्री राजा शिवछत्रपती' ही अक्षरे कोरलेली, सोन्याचा होन व ताब्याची 'शिवराई' ही खास नाणी पाडण्यात आली.

शिवराई

महाराजांचा राज्याभिषेक ही एक क्रातिकारी घटना होती सभासद म्हणतो, 'मऱ्हाटा पातशाह येव्हढा छत्रपती जाला ही गोष्ट काही सामान्य झाली नाही'

**कर्नाटक मोहीम** : इ स. १६७७ मध्ये शिवाजीमहाराजानी दक्षिणेत कर्नाटक मोहीम काढली. शिवाजीमहाराजानी प्रथम गोवळकोडा येथे जाऊन कुतुबशाहाची भेट घेतली त्याच्याशी मैत्रीचा तह केला शिवाजीमहाराजाचा सावत्र भाऊ व्यंकोजी हा तजावर येथे राज्य करत होता. त्याला स्वराज्याच्या कार्यात सहभागी करून घेण्याचा प्रयत्न महाराजानी केला; परंतु याला व्यंकोजीने विरोध केला तेव्हा महाराजांनी लढाईत त्याचा पराभव केला.

कर्नाटक मोहिमेत शिवाजीमहाराजानी जिजी, वेल्लोर इत्यादी किल्ले आणि आदिलशाहीचा काही प्रदेश जिंकून घेतला

कर्नाटक मोहिमेनतर अवघ्या दोनच वर्षानी ३ एप्रिल, १६८० रोजी महाराजाचे रायगडावर निधन झाले.

शिवाजीमहाराजाची समाधी : रायगड

## स्वाध्याय

१. कंसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा .

(अ) मे, १६६० मध्ये ------ पुण्यातील लालमहाल या वाड्यात तळ ठोकला. (अफजलखानाने, सिद्दी जौहराने, शायिस्तेखानाने)

(आ) ६ जून, १६७४ रोजी ------ येथे शिवाजीमहाराजाचा राज्याभिषेक झाला. (राजगड, रायगड, प्रतापगड)

(इ) राज्याभिषेक प्रसगी सोन्याचा ------ व ताब्याची शिवराई ही नाणी पाडण्यात आली. (रुपया, होन, टका)

२. पुढील प्रश्नांची चार ते पाच वाक्यांत उत्तरे द्या :

(अ) शिवाजीमहाराजानी सुरतेवर स्वारी का केली ?

(आ) शिवाजीमहाराजानी जयसिगाशी तह करण्याचा निर्णय का घेतला ? या तहाचे नाव सागा.

(इ) महाराजांनी बादशाहाच्या भेटीस आग्र्यास जावे असा प्रस्ताव जयसिंगाने का माडला ?

(ई) शिवाजीमहाराजांनी राज्याभिषेक करून घेण्याचे का ठरवले ?

३. पुढील घटना कालानुक्रमाने लिहा :

(अ) शिवाजीमहाराजांची सुरतेवर स्वारी, इ. स. १६६४.

(आ) शिवाजीमहाराजानी पुरदरचा तह केला .

(इ) शिवाजीमहाराजांचा राज्याभिषेक

(ई) शिवाजीमहाराज आग्र्यास बादशाहाच्या भेटीस गेले.

● ● ●

# १८. शिवाजीमहाराजांची राज्यव्यवस्था

शिवाजीमहाराजानी निर्माण केलेल्या स्वराज्यात महाराष्ट्रातील नाशिक, पुणे, सातारा, सागली, कोल्हापूर, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, रायगड व ठाणे या जिल्ह्यामधील काही भाग मोडत होता तसेच कर्नाटक राज्यातील बेळगाव, कारवार व धारवाड जिल्ह्यातील काही भाग आणि तमिळनाडू राज्यातील जिजी आणि वेल्लोर हे भागही स्वराज्यात समाविष्ट होते. स्वराज्याचा कारभार सुरळीत चालावा, स्वराज्यात सुरक्षितता व स्थैर्य नादावे म्हणून महाराजानी कार्यक्षम प्रशासनव्यवस्था उभी केली.

**प्रशासकीय विभाग** : खेडे हा शिवाजीमहाराजांच्या प्रशासनाचा सर्वात लहान घटक होता अनेक खेड्याचा मिळून एक 'महाल' किवा 'तर्फ' होत असे. काही महालाचा मिळून एक 'सुभा' आणि काही सुभ्याचा मिळून एक 'सरसुभा' होत असे.

खेड्याच्या कारभाराची जबाबदारी पाटील व कुलकर्णी या अधिकाऱ्यांकडे असे गावाचे रक्षण करणे, महसूल गोळा करणे, गावातील लागवडीखालील जमिनीचे क्षेत्र वाढवणे इत्यादी कामे पाटलास पार पाडावी लागत. गावाच्या महसुलासंबंधीची कागदपत्रे व हिशोब लिहिण्याचे व ते जतन करण्याचे काम कुलकर्णी या अधिकाऱ्याकडे असे

महाल या विभागाच्या कारभाराची जबाबदारी हवालदार या प्रमुख अधिकाऱ्याकडे असे. सुभ्याच्या प्रशासनाची जबाबदारी सुभेदाराकडे असे. सुभ्याचा महसूल गोळा करून तो सरकारी तिजोरीत भरणे, सुभ्यात शांतता व सुव्यवस्था ठेवणे इत्यादी कामे सुभेदाराकडे असत. सरसुभ्याची जबाबदारी सरसुभेदार या अधिकाऱ्याकडे असे.

**केंद्रीय प्रशासन**

**अष्टप्रधान मंडळ** : राज्यकारभारात मदत करण्यासाठी छत्रपतीनी आठ प्रधानाचे एक मंडळ नेमले होते. त्यास 'अष्टप्रधान मडळ' असे म्हणत. राज्यकारभाराची आठ खात्यात विभागणी केलेली होती राज्यकारभारावर सर्वसाधारण नियत्रण ठेवणे हे काम 'मुख्य प्रधान' ऊर्फ 'पेशवा' याच्याकडे होते राज्याचा जमाखर्च ठेवण्याची जबाबदारी अमात्यावर सोपवलेली होती. शासकीय पत्रव्यवहार पाहणे हे काम

छत्रपती शिवाजीमहाराज

(छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालय (प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम), मुंबई यांच्या सौजन्याने)

राजपूत चित्रशैली, सतरावे शतक
(छत्रपती शिवाजीमहाराज वस्तुसंग्रहालय (प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम), मुंबई याच्या सौजन्याने)

'सचिवा'चे होते. गुप्तहेराकडून आलेल्या बातम्याची छाननी करणे हे काम 'मत्री' पाहत असे. न्यायदानाचे काम न्यायाधीशाकडे होते. परराज्यसबध खाते 'सुमत' याच्या अखत्यारीत होते. सैन्याची व्यवस्था आणि राज्यरक्षण ही कामे सेनापतीची होती. 'पडितराव' हा धार्मिक व्यवहार खात्याचा प्रमुख होता. अष्टप्रधान मडळातील प्रधानाची नेमणूक स्वत· छत्रपती करत.

वरील महत्त्वाच्या खात्याशिवाय अन्यही काही लहान खाती होती त्याना 'कारखाने' असे म्हणत. असे एकूण अठरा कारखाने होते. त्याच्या कारभाराची जबाबदारीही अष्टप्रधानांकडे होती. छत्रपतीचा खाजगी व गोपनीय पत्रव्यवहार सांभाळण्यासाठी चिटणीस हा अधिकारी असे.

**न्यायव्यवस्था** : अष्टप्रधान मडळातील न्यायाधीशाच्या नेतृत्वाखाली महाराजानी स्वतत्र न्यायखाते निर्माण केले. याशिवाय गोतसभा, ब्रम्हसभा, जातिसभा यासारख्या न्यायनिवाडा करणाऱ्या परपरागत सस्था अस्तित्वात होत्या काही प्रसंगी छत्रपती स्वत:च न्यायनिवाडा करत.

**जमीनमहसूलव्यवस्था** : मध्ययुगीन अर्थव्यवस्था ही कृषिप्रधान असल्यामुळे जमीनमहसूल हे स्वराज्याच्या उत्पन्नाचे महत्वाचे साधन होते.

शिवाजीमहाराजानी अण्णाजी दत्तो याच्या साहाय्याने महसूलव्यवस्था लावली त्यानुसार महसूल आकारण्यासाठी लागवडीयोग्य जमिनीची मोजणी करण्यात येई जमिनीची प्रतवारी ठरवली जाई. महसूल आकारताना जमिनीचा पोत, पिकाचा प्रकार, जलसिचनाच्या सोई या गोष्टी विचारात घेतल्या जात. जमिनीच्या एकूण उत्पन्नाचा सुमारे चाळीस टक्के भाग महसूल म्हणून घेतला जाई. धान्याच्या किंवा रोख पैशाच्या रूपाने महसूल गोळा केला जाई महसूल गोळा करताना 'रयतेचा वाटा रयतेस पावे आणि राजभाग आपणास येई ते करणे' अशी महाराजाची आज्ञा होती.

जमीनमहसुलाबरोबरच सरकारला व्यवसायकर, जकाती, आयात-निर्यातकर, मिठावरील कर इत्यादी अन्य करांपासून उत्पन्न मिळत असे.

**लष्करी व्यवस्था** : पायदळ व घोडदळ हे शिवाजीमहाराजाच्या लष्कराचे प्रमुख विभाग होते

दहा सैनिकाचे एक पथक हा पायदळातील सर्वांत लहान घटक होता त्यावर

'नाईक' हा अधिकारी असे पाच नाइकांवर एक 'हवालदार' असे. दोन हवालदारांवर एक 'जुमलेदार' व दहा जुमलेदारांवर 'हजारी' अशी अधिकाऱ्याची नेमणूक केलेली असे. 'सरनोबत' हा पायदळातील सर्वोच्च अधिकारी होता.

घोडदळात बारगीर आणि शिलेदार असे दोन प्रकारचे सैनिक होते. शिलेदार स्वतःचे घोडे व स्वत.ची शस्त्रास्त्रे आणत. बारगिराना सरकारकडून घोडे आणि शस्त्रास्त्रे पुरवली जात. महाराजाच्या घोडदळात प्रामुख्याने बारगिरांचा भरणा होता या सरकारी मालकीच्या घोडदळाला 'पागा' असे म्हणत. घोडदळातही पायदळासारख्याच अधिकाऱ्यांच्या श्रेणी असत नेताजी पालकर, प्रतापराव गुजर, हबीरराव मोहिते हे शिवाजीमहाराजाच्या घोडदळाचे सरनोबत होते

**आरमार** : आरमार हे शिवाजीमहाराजाच्या लष्करी व्यवस्थेचे एक वैशिष्ट्य होते 'ज्याच्याजवळ आरमार त्याचा समुद्र' हे आरमाराचे महत्त्व शिवाजीमहाराजानी ओळखले होते. त्या वेळी भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीज व सिद्दी यांचे वर्चस्व होते. त्याच्यापासून स्वराज्याच्या किनारपट्टीचे रक्षण करण्यासाठी महाराजांनी आरमार उभे केले महाराजाच्या आरमारात गुराब, गलबत, पाल, शिबाड,

गुराब गलबत

तराडे, तारू, तिरकाटी, मचवा इत्यादी विविध प्रकारची जहाजे होती यातील गुराब, गलबत व पाल ही लढाऊ जहाजे होती. गलबत हे सर्वात मोठे जहाज होते कल्याण, पनवेल, मालवण इत्यादी ठिकाणी जहाजे बांधली जात. महाराजाच्या आरमारात विविध प्रकारची सुमारे चारशे जहाजे होती. आरमाराच्या मुख्य अधिकाऱ्यास 'दर्यासारग' असे म्हणत मायनाक भंडारी व दौलतखान हे महाराजाचे प्रमुख आरमारी अधिकारी होते.

सिंधुदुर्ग

**किल्ले** स्वराज्याच्या संरक्षणाच्या दृष्टीने किल्ल्यांना अनन्यसाधारण महत्त्व होते किल्ल्यांच्या बळावर थोड्या फौजेनिशी आक्रमकाशी दीर्घ काळ लढत देता येत असे त्याचप्रमाणे आसपासच्या प्रदेशाचे रक्षणही करता येत असे. महाराजांनी किल्ल्यांना विशेष महत्त्व दिले. प्रतापगड, राजगड, पावनगड यांसारखे डोंगरी किल्ले त्यांनी बांधले त्याचबरोबर कोकण किनारपट्टीच्या रक्षणासाठी सिंधुदुर्ग, पद्मदुर्ग, विजयदुर्ग यांसारखे सागरी किल्ले बांधून महाराजांनी आरमाराची केंद्रे उभी केली

**कार्यक्षम हेरयंत्रणा** . स्वराज्यातील व परराज्यातील घडामोडीची माहिती गोळा करण्यासाठी महाराजांनी हेरांची नेमणूक केली होती. बहिर्जी नाईक हा शिवाजीमहाराजांचा प्रमुख हेर होता

शिवाजीमहाराजांनी कार्यक्षम प्रशासनव्यवस्था निर्माण केली. हे प्रशासन लोकाभिमुख आहे, लोकांच्या कल्याणासाठी आहे, याची महाराजांच्या अधिकाऱ्यांना पूर्ण जाणीव होती महाराजांचे प्रशासन कसे लोकाभिमुख होते, हे आपण पुढील पाठात पाहणार आहोत

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या .
   (अ) कुलकर्णी या अधिकाऱ्याचे काम कोणते होते ?
   (आ) महाल किंवा तर्फ म्हणजे काय ?
   (इ) स्वराज्यात सरकारी उत्पन्नाच्या विविध बाबी कोणत्या होत्या ?

(ई) दर्यासारंग कोणास म्हणत ?

(उ) बहिर्जी नाईक याच्याकडे कोणते काम सोपवण्यात आले होते ?

२. कसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा:

(अ) परराज्यसबध खाते ----------- याच्या अखत्यारीत होते
(पेशवा, सेनापती, सुमत)

(आ) दहा सैनिकाच्या पथकाच्या अधिकाऱ्यास ----------- असे म्हणत
(हवालदार, जमादार, नाईक)

(इ) सरकारी मालकीच्या घोडदळाला -------------- असे म्हणत.
(स्वाराची पलटण, पागा, तबेला)

३. योग्य त्या जोड्या लावा :

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| (अ) पंडितराव | (१) राज्यकारभारावर सर्वसाधारण नियंत्रण |
| (आ) सचिव | (२) धार्मिकव्यवहार खातेप्रमुख |
| (इ) मुख्य प्रधान | (३) राज्याचा जमाखर्च |
| (ई) अमात्य | (४) शासकीय पत्रव्यवहार |
| | (५) महाराजाचा गोपनीय पत्रव्यवहार |

४. पुढील प्रश्नाची तीन ते चार वाक्यात उत्तरे द्या .

(अ) स्वराज्यातील 'जमीनमहसूलव्यवस्था'

(आ) छत्रपतीचे आरमार

(इ) स्वराज्यातील किल्ले व त्याचे महत्व

५. पुढील तक्ता पूर्ण करा .

| प्रशासकीय विभाग | विभागाचा अधिकारी |
|---|---|
| (अ) सरसुभा | (१) ------------- |
| (आ) ------------ | (२) सुभेदार |
| (इ) महाल | (३) ------------- |
| (ई) ------------- | (४) पाटील |

६. उपक्रम .

शिवाजीमहाराजाच्या आरमारातील लढाऊ जहाजाची चित्रे मिळवा

● ● ●

## १९. आदर्श राज्यकर्ता

शिवाजीमहाराजानी सामान्य लोकाच्या मदतीने लहानशा जहागिरीतून स्वराज्य निर्माण केले एक आदर्श अशी प्रशासनव्यवस्था उभी करून त्यानी या स्वराज्याचे सुराज्य केले आपल्या कर्तृत्वाने त्यानी 'नूतन सृष्टीच निर्माण केली'.

**शेती व्यवसायाला उत्तेजन** : स्वराज्यातील बहुसख्य प्रजा शेतीवर अवलबून असल्यामुळे शिवाजीमहाराजानी शेतकऱ्याच्या कल्याणाची विशेष काळजी घेतली त्यानी शेतीला उत्तेजन दिले. पडीक जमीन लागवडीखाली आणण्यासाठी लोकाना अनेक सवलती दिल्या. नवीन रयत राज्यात आल्यास तिला गुरेढोरे, बी-बियाणे व शेतीची अवजारे घेण्यासाठी बिनव्याजी कर्जे देण्याची व्यवस्था केली. कर्जाची रक्कम सुलभ हप्त्याने वसूल केली जाई शत्रुसैन्याकडून रयतेच्या पिकांचे नुकसान झाल्यास तिला भरपाई दिली जाई. दुष्काळी परिस्थितीत जमीनमहसुलात सूट दिली जाई

**रयतेचा राजा** : 'प्रजेचे सुख तेच राजाचे सुख, प्रजेचे हित तेच राजाचे हित' या विचाराला अनुसरून महाराज वागत आपल्या अधिकाऱ्यानी प्रजेचे शोषण करू नये यासाठी महाराज दक्ष असत 'धान्य वा इतर वस्तू योग्य भावाने विकत घ्या. त्यासाठी कोणावरही जुलूम-जबरदस्ती करू नका, शेतकऱ्याच्या भाजीच्या देठाचीही अपेक्षा करू नका', अशी महाराजांची आपल्या अधिकाऱ्यांना सक्त ताकीद होती.

शत्रुसैन्याकडून आपल्या प्रजेला उपद्रव होऊ नये, म्हणून महाराज फार काळजी घेत असत. शत्रूच्या हल्ल्याची शक्यता असेल, तर प्रजेला सुरक्षित स्थळी पोहोचवण्याची जबाबदारी देशमुख, पाटील इत्यादी स्थानिक अधिकाऱ्यावर असे. इ स. १६६२ मध्ये शायिस्तेखानाच्या स्वारीच्या वेळी, लोकांना सुरक्षित स्थळी पोहोचवण्यात हयगय करू नये, असा कडक आदेश महाराजानी रोहिडखोऱ्याच्या देशमुखाला दिला होता

**व्यापाराला उत्तेजन** : स्वराज्याची संपन्नता वाढवण्यासाठी शिवाजीमहाराजानी व्यापाराला उत्तेजन दिले स्वराज्यात व्यापारी पेठा वसवल्या. व्यापाऱ्याना अनेक सवलती दिल्या देशांतर्गत व्यापाराबरोबरच परदेशी व्यापार वाढवण्याचाही

शिवाजीमहाराजानी प्रयत्न केला. परकीय व्यापाऱ्याशी सबध ठेवताना वा त्याना सवलती देताना महाराज अत्यत सावध होते. महाराजानी परकीय व्यापाऱ्यांच्या हालचालीवर बारीक नजर ठेवून त्याना वेळीच जरब बसवली रामचद्रपत अमात्य यांनी शिवाजीमहाराजाचे व्यापारविषयक धोरण आपल्या 'आज्ञापत्र' या ग्रंथात स्पष्ट केले आहे.

स्वराज्यातील उद्योगधदे वाढावेत यासाठीही शिवाजीमहाराजानी प्रयत्न केले शेती, व्यापार आणि उद्योगधदे यांना उत्तेजन देऊन महाराजांनी स्वराज्याचा आर्थिक पाया बळकट केला

**धार्मिक सहिष्णुता** : महाराजांचे धार्मिक धोरण उदार होते. जात, धर्म, पंथ याचा विचार न करता स्वराज्यात त्यानी सर्वांना समान वागणूक दिली मंदिरे तसेच मशिदी व दर्गे यांनाही त्यानी देणग्या दिल्या ख्रिस्ती लोकांच्या प्रार्थनामदिराचीही त्यानी जपणूक केली. शिवाजीमहाराजाच्या धार्मिक उदारतेबद्दल तत्कालीन इतिहासकार काफीखान लिहितो, 'शिवाजीने आपल्या सैनिकासाठी असा सक्त नियम केला होता, की मोहिमेवर असताना त्यांनी मशिदीला धक्का लावू नये. कुरआनची एखादी प्रत हाती पडल्यास तिला पूज्यभाव दाखवून ती मुसलमान व्यक्तीच्या स्वाधीन करावी'.

आपले अधिकारी, सेवक याची निवड करताना महाराजानी जात-धर्म-पथ यांचा विचार केला नाही त्यांनी गुणाना व कर्तृत्वाला महत्त्व दिले

**महाराजांची शिस्त** · स्वराज्यात अधिकाऱ्याच्या वागणुकीचे व शिस्तीचे नियम कडक होते शिस्त मोडणाऱ्यांना शासन केले जाई अधिकाऱ्यांनी भ्रष्टाचार करू नये, प्रजेवर अन्याय करू नये, म्हणून त्यांच्यावर कडक नजर ठेवली जाई कामात कुचराई करणाऱ्या अधिकाऱ्याना शासन केले जाई काही वेळा आपल्या पदावरून त्याना काढूनही टाकले जाई. एका सुभेदाराने आपल्या कामात हयगय केली तेव्हा त्याला जाब विचारून 'ऐशा चाकरांस ठाकेठीक केले पाहिजेत' असे महाराजानी म्हटले आहे.

अधिकाऱ्यानी एकाच भागात राहून आपले स्वार्थी हितसंबध वाढवू नयेत व शिरजोर बनू नये, म्हणून त्याच्या बदल्या केल्या जात. स्वराज्याच्या प्रशासनात वशपरंपरेने अधिकारपदे शक्यतो दिली जात नसत अधिकाऱ्यांना सेवेबद्दल वतने

किवा जहागिरी देण्याऐवजी त्याना सरकारी तिजोरीतून रोख पगार दिला जाई.

**राज्यव्यवहारकोश** : स्वराज्याचा कारभार मराठी भाषेत व्हावा, असा शिवाजीमहाराजाचा कटाक्ष होता. त्यासाठी त्यांनी 'राज्यव्यवहारकोश' हा ग्रथ तयार करवून घेतला.

**महान सेनानी** : शिवाजीमहाराज हे एक महान सेनानी होते. शौर्य, धैर्य व साहस यांबाबतीत ते अजोड होते. कोणत्याही सकटाचा सामना करण्याचे सामर्थ्य व आत्मविश्वास महाराजाच्या ठिकाणी होता. त्यानी गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीचा अवलब करून आपल्या शत्रूंना नामोहरम केले. शिवाजीमहाराजानी कार्यक्षम लष्कराची उभारणी केली. आपल्या लष्करात समाजाच्या सर्व थरातील लोकाचा भरणा त्यानी केला हे लष्कर स्वराज्यप्रेमाने भारलेले होते.

महाराजाच्या लष्कराची शिस्त कडक होती सैनिकानी रयतेला त्रास देऊ नये, कोणाला गुलाम करू नये, कोणत्याही धर्मस्थळास हानी पोचवू नये अशी महाराजाची सक्त ताकीद होती

स्वराज्यातील कृषिउत्पन्न आणि व्यापार वाढला पाहिजे; स्वराज्य आर्थिकदृष्ट्या सपन्न असले पाहिजे; जुलमी व भ्रष्ट अधिकाऱ्याना शासन झाले पाहिजे, स्त्रियांना मानाने जगता आले पाहिजे; स्वराज्यातील प्रजा सुखी असली पाहिजे, असे शिवाजीमहाराजाचे उदात्त ध्येय होते या उदात्त ध्येयासाठी महाराज अविरत झटले. शिवाजीमहाराज हे एक थोर राष्ट्रपुरुष होते

रायगडचा बालेकिल्ला व मनोरे

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) शिवाजीमहाराजानी शेतकऱ्यांच्या कल्याणाची विशेष काळजी का घेतली ?

(आ) शिवाजीमहाराजानी व्यापाराला उत्तेजन का दिले ?

(इ) अधिकारी व सेवक यांची निवड करताना महाराज कोणत्या गोष्टींना महत्त्व देत ?

(ई) अधिकाऱ्याच्या बदल्या का केल्या जात ?

२. कसात दिलेल्या शब्दांतील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा .

(अ) स्वराज्याचा कारभार मराठी भाषेत व्हावा म्हणून महाराजांनी -------------- हा ग्रंथ तयार करून घेतला

(शासनकोश, राज्यव्यवहारकोश, आज्ञापत्र)

(आ) शिवाजीमहाराज हे एक थोर -------------- होते

(सत्ताधीश, राष्ट्रपुरुष, वतनदार)

३. पुढील प्रश्नाची चार ते पाच वाक्यात उत्तरे द्या :

(अ) शेतीला उत्तेजन देण्यासाठी शिवाजीमहाराजांनी कोणते उपाय योजले ?

(आ) 'महाराजाचे धार्मिक धोरण उदार होते' हे विधान स्पष्ट करा

(इ) शिवाजीमहाराजाची लष्कराविषयीची कडक शिस्त याविषयी माहिती द्या

(ई) कोणत्या उदात्त ध्येयासाठी महाराज अविरत झटले ?

● ● ●

# २०. मराठ्यांचा स्वातंत्र्यसंग्राम

शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनतर मुघल बादशाह औरंगजेब दक्षिणेत चालून आला. मराठ्यांनी छत्रपती सभाजी व त्यानतर छत्रपती राजाराम आणि राणी ताराबाई याच्या नेतृत्वाखाली स्वराज्यरक्षणासाठी पंचवीस वर्षे मुघलाशी प्रखर लढा दिला. या लढ्याला मराठ्याचा स्वातंत्र्यसंग्राम असे म्हणतात. या संग्रामात अनेक अडचणीवर मात करून मराठे विजयी झाले स्वातत्र्यसंग्राम हे मराठ्याच्या इतिहासातील एक रोमहर्षक व तेजस्वी पर्व होते. त्याचा अभ्यास आपण या पाठात करणार आहोत

**छत्रपती संभाजी :** शिवाजीमहाराजाच्या मृत्यूनंतर त्याचा थोरला मुलगा सभाजी हा छत्रपती झाला या वेळी मराठ्याचा मुघलाशी सघर्ष चालू होता. स्वराज्याची

छत्रपती संभाजी

सूत्रे आपल्या हाती घेतल्यानतर थोड्याच दिवसांत संभाजीने आपली फौज पाठवून बऱ्हाणपूर व जालना ही मुघलांची शहरे लुटली.

**औरंगजेब बादशाहाची दक्षिणेवर स्वारी :** औरंगजेबाचा मुलगा शाहजादा

अकबर याने आपल्या पित्याविरुद्ध बड केले हे बंड बादशाहाने मोडून काढले. अकबर पराभूत होऊन दक्षिणेत सभाजीच्या आश्रयाला आला. अकबराचे पारिपत्य करण्यासाठी व दक्षिणेत मुघल साम्राज्याचा विस्तार करण्यासाठी बादशाह स्वत. इ स. १६८२ मध्ये दक्षिणेत आला. त्याच्याबरोबर अफाट सैन्य व प्रभावी तोफखाना होता बादशाहाने जजिऱ्याच्या सिद्दीला मराठ्यांच्या विरुद्ध चिथावणी दिली. पोर्तुगिजाना आपल्या बाजूला वळवून घेतले यामुळे सभाजीवर एकाच वेळी या सर्व शत्रूना तोड देण्याचा प्रसग आला तरीही चार-पाच वर्षे त्याने मुघलांना दाद दिली नाही.

**सिद्दी व पोर्तुगीज यांच्या विरुद्ध मोहीम :** जंजिऱ्याचा सिद्दी मराठी मुलखाला उपद्रव देत असे. सभाजीने त्याच्या विरुद्ध मोहीम उघडली. मराठ्यानी सिद्दीच्या ताब्यातील दंडाराजपुरी या किल्ल्याला वेढा घातला व जंजिऱ्यावरही तोफाचा भडिमार केला. याच वेळी मुघलांचे सैन्य स्वराज्यावर चालून आले. त्यामुळे जजिऱ्याची मोहीम अर्धवट सोडून सभाजीला माघारी फिरावे लागले.

गोव्याच्या पोर्तुगिजानी सभाजीविरुद्ध बादशाहाशी हातमिळवणी केली होती त्यामुळे संभाजीने पोर्तुगिजाना धडा शिकवण्याचे ठरवले. त्याने पोर्तुगिजाच्या चौल या बंदरावर हल्ला केला. प्रत्युत्तर म्हणून पोर्तुगिजांनी गोव्याच्या सीमेवरील मराठ्याच्या फोडा या किल्ल्यास वेढा घातला मराठ्यांनी हा वेढा मोडून काढला व खुद्द गोव्यावरच चढाई केली. पोर्तुगीज मोठ्या सकटात सापडले. याच वेळी मुघलानी दक्षिण कोकणवर आक्रमण केल्याची बातमी सभाजीला मिळाली त्यामुळे हाताशी आलेला गोव्याचा विजय सोडून त्याला मुघलांचा प्रतिकार करण्यासाठी परतावे लागले.

**आदिलशाही व कुतुबशाहीचा शेवट :** दक्षिणेत आल्यानतर औरगजेब बादशाहाने मराठ्यांना पराभूत करण्यासाठी चार-पाच वर्षे कसून प्रयत्न केले परतु त्याला यश आले नाही मराठ्याचा पाडाव सहजासहजी होणार नाही, हे लक्षात घेऊन बादशाहाने काही काळ मराठ्याविरुद्धची मोहीम स्थगित केली त्याने आपला मोर्चा आदिलशाही व कुतुबशाही या राज्यांकडे वळवला. बादशाहाने ही राज्ये अनुक्रमे इ स १६८६ व इ. स. १६८७ मध्ये जिकून घेतली. ही राज्ये जिंकून घेतल्यानतर बादशाह आपला मोर्चा पुन्हा स्वराज्याकडे वळवील याचे भान

सभाजीने ठेवले नाही. तो गाफील राहिला.

**मराठ्यांवर पुन्हा हल्ला** : विजापूर व गोवळकोडा या दोन्ही राज्यांची संपत्ती व लष्कर मुघलाच्या हाती आल्यामुळे बादशाहाची स्थिती मजबूत झाली यानंतर मराठ्यांचा पाडाव करण्यावर बादशाहाने आपली सर्व शक्ती केंद्रित केली. मराठी प्रदेशावर चोहोबाजूंनी हल्ले चढवले. मुघल सैन्याने मराठी प्रदेशात धुमाकूळ घालून तो उद्‌ध्वस्त करायला सुरुवात केली. मुघल सेनेचा प्रतिकार करताना डिसेबर १६८७ मध्ये मराठ्याचा सेनापती हबीरराव मोहिते मारला गेला त्यामुळे संभाजीची लष्करी बाजू कमकुवत झाली

**संभाजीचा मृत्यू** : औरगजेबाने मुकर्रबखान याची नेमणूक कोल्हापूर प्रातावर केली होती संभाजी कोकणातील संगमेश्वर येथे असल्याची बातमी मुकर्रबखानास कळली, तेव्हा छापा घालून त्याने सभाजीस पकडले बादशाहाच्या हुकमाने ११ मार्च, १६८९ रोजी अत्यंत अमानुषपणे संभाजीला ठार करण्यात आले. स्वाभिमान न सोडता अत्यत धीरोदात्तपणे मराठ्यांचा हा छत्रपती मृत्यूला सामोरा गेला.

सभाजी शूर व पराक्रमी होता अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत त्याने नऊ वर्षे सामर्थ्यशाली मुघल सत्तेशी झुंज देऊन वीरमरण पत्करले

**छत्रपती राजाराम** : संभाजीच्या मृत्यूनतर मराठी राज्य जिकून घेण्याचे आपले स्वप्न साकार होणार असे औरगजेबाला वाटू लागले, परंतु आपल्या छत्रपतीची बादशाहाने ज्या अमानुषपणे हत्या केली, त्यामुळे मराठे अधिक जिद्दीने पेटून उठले त्यानी संभाजीचा धाकटा भाऊ राजाराम यास छत्रपती केले स्वराज्यरक्षणासाठी मुघलाशी निकराचा लढा देण्यासाठी ते सज्ज झाले

छत्रपती राजाराम

बादशाहाने रायगडाला वेढा घालण्यासाठी झुल्फिकारखान यास पाठवले या वेळी राजाराम व राणी ताराबाई, सभाजीची पत्नी येसूबाई व पुत्र शाहू हे रायगडावरच होते. राजघराण्यातील सर्वांनी एकाच ठिकाणी

राहणे धोक्याचे होते. तेव्हा छत्रपतीनी रायगडाच्या वेढ्यातून बाहेर पडावे व आवश्यकता भासल्यास दूरवर जिंजीला जावे, त्याचप्रमाणे राणी येसूबाईच्या नेतृत्वाखाली रायगड लढवावा असे धोरण ठरवण्यात आले.

**राजारामाचे जिंजीला प्रयाण** ५ एप्रिल, १६८९ रोजी राजाराम आपल्या काही सहकाऱ्यासह रायगडाच्या वेढ्यातून निसटला. त्यांनी दक्षिणेत जिंजीला जाण्याचा निर्णय घेतला. जिंजीचा किल्ला अभेद्य होता दूरवरचा हा किल्ला जिंकून घेणे मुघलाना सोपे नव्हते. प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाळ, रुपाजी भोसले इत्यादी विश्वासू लोकाना बरोबर घेऊन राजारामाने जिंजीचा मार्ग धरला. अनेक संकटांना तोंड देत तो जिंजीला पोहोचला यापुढे जिंजी हे मराठ्याच्या राज्यकारभाराचे एक केंद्र झाले त्यामुळे स्वातंत्र्यलढा जिंजीपर्यंतच्या विस्तृत प्रदेशात पसरला

**मराठ्यांच्या हालचाली** . रायगड किल्ला जिंकण्यास कठीण असला, तरी मुघल सामर्थ्यापुढे तो दीर्घ काळ लढवणे अशक्य होते. मुघलानी नोव्हेंबर, १६८९ मध्ये रायगड ताब्यात घेतला आणि राणी येसूबाई व शाहू याना कैद केले. राजारामाने जिंजीला जाताना स्वराज्याच्या रक्षणाची कामगिरी रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण सचिव, संताजी घोरपडे व धनाजी जाधव याच्यावर सोपवली होती तेव्हापासून विशाळगड हे स्वराज्यातील हालचालीचे केंद्र झाले.

मराठ्यांच्या दृष्टीने परिस्थिती आणीबाणीची होती. बादशाहाने अनेक मराठी सरदारांना वतने व जहागिरी देऊन आपल्या बाजूला वळवून घेतले होते बादशाहाला शह देण्यासाठी राजारामानेही तेच तंत्र वापरले व मराठी सरदाराना जहागिरी देणे सुरू केले मराठी सरदारानी मुघल प्रदेश जिंकल्यास त्या प्रदेशाची जहागीर त्या सरदारांस दिली जाईल, असे आश्वासन देण्यात आले. छत्रपतीच्या या आश्वासनामुळे अनेक पराक्रमी सरदार पुढे आले त्यांनी मुघल प्रदेशावर धडाक्याने आक्रमणाला सुरुवात केली मुघल सेनानींना पराभूत केले. या पराक्रमात संताजी व धनाजी आघाडीवर होते त्याचे अनपेक्षित हल्ले व गनिमी कावा यापुढे मुघल हतबल झाले. मराठे कोणत्या भागावर हल्ले करतील हे सांगता येईना मुघल साम्राज्याची प्रचंड साधनसामग्री व अवजड तोफखाना याचा या युद्धात उपयोग होईना.

मराठ्यानी बादशाहाला सळो की पळो करून सोडले. एकदा तर संताजी घोरपडे व विठोजी चव्हाण यानी बादशाहाच्या छावणीवर अचानक हल्ला करून त्याच्या

तबूवरील सोन्याचा कळस कापून नेला

**जिंजीला वेढा :** रायगड ताब्यात घेतल्यावर बादशाहाने झुल्फिकारखानाला दक्षिणेस जिंजीच्या स्वारीवर पाठवले. त्याने ऑगस्ट, १६९० मध्ये जिंजीला वेढा घातला. मराठ्यांनी जिंजीचा किल्ला जवळ जवळ आठ वर्षे निकराने लढवला. सताजी व धनाजी यानी वेढा घालणाऱ्या मुघल सेनेवर बाहेरून प्रखर हल्ले चढवले. तिची रसद तोडली. परंतु इ. स. १६९८ च्या सुरुवातीस झुल्फिकारखानाने किल्ला जिंकून घेतला. त्याआधीच राजाराम वेढ्यातून बाहेर पडला होता.

राजाराम महाराष्ट्रात परत आल्यामुळे मराठ्यांचा जोर आणखीनच वाढला. त्यांनी मुघलाच्या ताब्यातील खानदेश, वऱ्हाड, बागलाण या प्रदेशांवर हल्ले चढवले; परतु दुर्दैवाने अल्पशा आजाराने राजारामाचे मार्च, १७०० मध्ये सिहगडावर निधन झाले

**महाराणी ताराबाई :** राजारामाच्या मृत्यूनंतर मराठ्यांविरुद्धचा संघर्ष थाबेल असे बादशाहाला वाटले, परतु राजारामाची कर्तबगार पत्नी ताराबाई हिने आपला अल्पवयीन मुलगा दुसरा शिवाजी यास गादीवर बसवले आणि स्वातंत्र्यलढा नेटाने पुढे चालवला खडेराव दाभाडे याने मुघलाना पराभूत करून गुजरातेत अहमदाबादपर्यंत धडक मारली नेमाजी शिदे याने नर्मदा ओलांडून माळव्यात सिरोंजपर्यंत मुसंडी मारून मुघलाना जेरीस आणले मराठ्यांच्या या आक्रमक चढायांमुळे औरंगजेब बादशाह हताश झाला सतत पचवीस वर्षे मुघल-मराठे सघर्ष चालू होता, परतु मराठ्याचा पाडाव करणे मुघलाना जमले नाही. अशा परिस्थितीत औरगजेब बादशाहाचा फेब्रुवारी, १७०७ मध्ये अहमदनगर येथे मृत्यू झाला त्याच्या मृत्यूबरोबरच मराठ्याचा स्वातत्र्यसग्राम समाप्त झाला.

महाराणी ताराबाई

मराठ्याचा हा स्वातत्र्यसंग्राम भारताच्या इतिहासातील एक महत्त्वाचे पर्व होय.

मुघल सत्ताधीशाची साम्राज्याकाक्षा आणि मराठी जनतेची स्वातंत्र्याकाक्षा याच्यातील हा लढा होता त्यात मराठ्याचा विजय झाला.

## स्वाध्याय

१ प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या :

(अ) महाराजाच्या मृत्यूनतर मराठ्यानी कोणाकोणाच्या नेतृत्वाखाली औरगजेबाशी प्रखर लढा दिला ?

(आ) शाहजादा अकबर छत्रपती सभाजीकडे आश्रयासाठी का आला ?

(इ) औरगजेब इ स १६८२ मध्ये दक्षिणेत का आला ?

(ई) छत्रपती सभाजीला जजिऱ्याची मोहीम अर्धवट का सोडावी लागली ?

२. कसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :

(अ) छत्रपती सभाजीने पोर्तुगिजाना धडा शिकवण्यासाठी त्याच्या --------- या बदरावर हल्ला केला
(दाभोळ, हर्णै, चौल)

(आ) मुघल सेनेचा प्रतिकार करताना मराठ्याचा सेनापती --------- मारला गेला
(बाजीप्रभू देशपाडे, हबीरराव मोहिते, यशवतराव होळकर)

(इ) मराठ्याच्या स्वातत्र्यसग्रामात काही काळ --------- हे मराठ्याच्या राज्यकारभाराचे एक केंद्र झाले
(तजावर, जिजी, बगळूर)

३ पुढील प्रश्नांची तीन ते चार वाक्यात उत्तरे द्या :

(अ) छत्रपती राजारामाने जिजीस जावे असा निर्णय का घेण्यात आला ?

(आ) छत्रपती राजारामाच्या कोणत्या धोरणामुळे कर्तबगार मराठी सरदार पुढे आले ?

४ उपक्रम ·

सताजी व धनाजी यानी मराठ्याच्या स्वातत्र्यसग्रामात गाजवलेल्या पराक्रमाची हकिकत मिळवून ती लिहून काढा व तिचे वर्गात सामूहिक वाचन करा

● ● ●

# २१. मराठी सत्तेचा विस्तार

मराठ्याच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या आरंभी मुघल सत्ता आक्रमक होती, तर मराठ्यांचे धोरण बचावाचे होते. स्वातंत्र्ययुद्धाच्या अखेरीस मात्र परिस्थिती उलट झाली. मराठ्यानी चढाईचे आणि मुघलानी बचावाचे धोरण स्वीकारले. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात मराठ्यानी मुघल सत्तेला नमवून जवळजवळ भारतभर आपला सत्ताविस्तार केला त्याचा अभ्यास आता आपण करूया.

औरंगजेब बादशाहाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलामध्ये दिल्लीच्या बादशाहीबद्दल संघर्ष सुरू झाला. शाहजादा आझमशाह हा दक्षिणेत होता बादशाही तख्त हस्तगत करण्यासाठी तो त्वरेने दिल्लीला निघाला राजपुत्र शाहू त्याच्या ताब्यात होता. शाहूला कैदेतून सोडल्यास तो व राणी ताराबाई याच्यात छत्रपतीच्या गादीसाठी आपसांत कलह होईल व त्यामुळे मराठ्याचे सामर्थ्य खच्ची होईल असे आझमशाहाला वाटले, म्हणून दिल्लीच्या वाटेवर असताना मे, १७०७ मध्ये त्याने माळव्यात शाहूची कैदेतून सुटका केली.

**शाहूचा राज्याभिषेक** कैदेतून सुटका झाल्यावर शाहूने महाराष्ट्राकडे कूच केले. वाटेत त्याला काही मराठी सरदार येऊन मिळाले. मात्र राणी ताराबाई हिने शाहूचा छत्रपतिपदावरील हक्क मान्य केला नाही तिने सेनापती धनाजी जाधव व परशुरामपंत प्रतिनिधी यांना शाहूविरुद्ध पाठवले भीमेच्या काठी खेड येथे झालेल्या लढाईत शाहूचा विजय झाला यानतर शाहूने आपला मोर्चा साताऱ्याकडे वळवला व सातारा जिकून घेतले. जानेवारी, १७०८ मध्ये शाहूने स्वतःस छत्रपती म्हणून राज्याभिषेक करवून घेतला.

छत्रपती शाहू

शाहूला असलेला ताराबाईचा विरोध त्याच्या राज्याभिषेकानतरही चालू राहिला उभयतांच्या सैन्यात चकमकी चालू असताना ताराबाईने इ स १७१० मध्ये पन्हाळगडावर आपला अल्पवयीन मुलगा दुसरा शिवाजी याच्या नावाने छत्रपतिपदाची घोषणा केली. तेव्हापासून मराठेशाहीत साताऱ्च्या राज्याखेरीज कोल्हापूरचे स्वतत्र राज्य अस्तित्वात आले.

**बाळाजी विश्वनाथाचा उदय** : शाहूची मुघलाच्या कैदेतून मुक्तता झाल्यावर त्याची बाजू घेणाऱ्यामध्ये बाळाजी विश्वनाथ भट हा प्रमुख होता बाळाजी हा मूळचा कोकणातील श्रीवर्धन या गावचा. तो कर्तृत्ववान व अनुभवी होता. शाहू हाच मराठी राज्याचा खरा वारस आहे, हे पटवून देऊन अनेक मराठी सरदाराना त्याने शाहूकडे वळवले.

कान्होजी आंग्रे हा मराठी आरमाराचा प्रमुख होता त्याने ताराबाईची बाजू घेऊन शाहूच्या मुलखावर हल्ले करायला सुरुवात केली शाहूने बाळाजीला पेशवा केले आणि कान्होजीविरुद्‌ध पाठवले बाळाजीने युद्‌ध टाळून मुत्सद्‌देगिरीने कान्होजीस शाहूकडे वळवले.

**चौथाई-सरदेशमुखीच्या सनदा** . शाहूचे आसन महाराष्ट्रात बळकट केल्यानतर बाळाजीने आपले लक्ष उत्तरेकडील राजकारणाकडे वळवले. औरगजेब बादशाहाच्या मृत्यूनतर दिल्ली दरबारात दुही व गोधळ निर्माण झाला होता. तेथे सय्यद बंधू अब्दुल्ला· (हसन) व हुसेन अली यांचे वर्चस्व निर्माण झाले होते. त्याच्या मदतीने बाळाजीने इ. स १७१९ मध्ये मुघल बादशाहाकडून चौथाई-सरदेशमुखी वसूल करण्याच्या सनदा मिळवल्या. या सनदामुळे मराठ्यांना दक्षिणेतील मुघल प्रदेशातून महसुली उत्पन्नाचा एक चतुर्थांश भाग (चौथाई) व एक दशांश भाग (सरदेशमुखी) गोळा करण्याचे हक्क मिळाले.

बाळाजी विश्वनाथाच्या मृत्यूनतर मराठी राज्याची सूत्रे त्याचा कर्तबगार मुलगा पहिला बाजीराव याच्या हाती आली. एप्रिल, १७२० मध्ये छत्रपती शाहूने त्यास पेशवेपद दिले.

**निजामाचा पालखेड येथे पराभव** : चिनकिलिचखान ऊर्फ निजाम-उल्-मुल्क हा इ स. १७१३ मध्ये दक्षिणचा मुघल सुभेदार म्हणून आला बादशाहाने मराठ्याना दक्षिणेच्या मुघल सुभ्यांतून चौथाई-सरदेशमुखी वसूल करण्याचे अधिकार दिले

होते. याला निजामाचा विरोध होता. त्याने कोल्हापूरच्या छत्रपती संभाजीला हाताशी धरून पुणे परगण्याचा काही भाग जिंकून घेतला. तेव्हा निजामाला शह देण्यासाठी बाजीरावाने त्याच्या प्रदेशावर आक्रमण केले. निजाम मागे फिरून आपल्या मुलखाकडे निघाला. बाजीरावाने निजामाला औरंगाबादजवळ पालखेड येथे गाठून त्याचा पराभव केला. त्यानंतर झालेल्या तहात निजामाने मराठ्यांचा चौथाई-सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्क मान्य केला, तसेच यापुढे कोल्हापूरच्या संभाजीची बाजू न घेण्याचे कबूल केले.

इ. स. १७१४ मध्ये कोल्हापूरच्या गादीवर आलेल्या छत्रपती संभाजीने शाहूला

पहिला बाजीराव

विरोध करण्याचे धोरण चालूच ठेवले तेव्हा शाहूने संभाजीविरुद्ध मोहीम काढून त्याला पराभूत केले. इ. स. १७३१ मध्ये उभयतात झालेल्या वारणेच्या तहाप्रमाणे वारणा नदी ही सातारा व कोल्हापूर या दोन मराठी राज्यातील सीमा ठरली व तेव्हापासून या दोन्ही राज्यातील सघर्ष थांबला

**बाजीरावाचे धोरण** ' मुघल सत्ता कमकुवत झालेली असल्याने उत्तरेला सत्ताविस्तार करण्यास अधिक वाव आहे, हे बाजीरावाने ओळखले होते. मुघल बादशाही अंकित झाली, की बाकीचे मुघल सुभेदार आपोआपच नामोहरम होतील, असा बाजीरावाचा विश्वास होता. शाहूने त्याच्या धोरणाला पाठिंबा दिला.

**माळवा व बुंदेलखंड** : उत्तरेत मराठ्यांचा लष्करी प्रभाव वाढवण्याच्या दृष्टीने माळवा हा प्रदेश महत्त्वाचा होता. तो प्रदेश मराठ्याच्या वर्चस्वाखाली आणण्यासाठी बाजीरावाने आपला भाऊ चिमाजीअप्पा याच्या नेतृत्वाखाली मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे व उदाजी पवार या मराठी सरदाराना माळव्यात पाठवले. मराठी फौजानी तेथील मुघल सुभेदाराला पराभूत केले (इ स १७२८)

शिवाजीमहाराजाच्या काळात बुदेलखडात छत्रसाल राजाने आपले स्वतंत्र राज्य स्थापन केले होते. इ स १७२८ मध्ये अलाहाबादचा मुघल सुभेदार महमदखान बंगश याने बुदेलखडावर हल्ला करून छत्रसाल राजास कैद केले छत्रसालाने बाजीरावाला मदतीची विनती केली. बाजीराव मोठी फौज घेऊन बुदेलखडात गेला. त्याने बंगशाला पराभूत केले. छत्रसालाने बाजीरावाचा मोठा सन्मान केला. त्याला आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा जहागीर म्हणून बहाल केला

अशा रीतीने माळवा व बुदेलखडात मराठ्यानी आपले वर्चस्व प्रस्थापित केले

औरंगजेबाने रायगड किल्ला सिद्दीच्या ताब्यात दिला होता. रायगड मुक्त करण्यासाठी इ स. १७३३ मध्ये बाजीरावाने जजिऱ्याविरुद्ध मोहीम काढली. मराठी फौजांनी रायगड पुन्हा जिंकून घेतला व सिद्दीचा काही मुलूख मराठी राज्याला जोडला

**दिल्लीवर स्वारी** . मराठ्याच्या माळव्यातील विजयामुळे दिल्ली दरबारात खळबळ उडाली. मराठ्याना माळवा प्रांतातून घालवून देण्याचे बादशाहाचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. बाजीरावाने बादशाहाकडे माळव्याच्या सुभेदारीची व खडणीची मागणी केली बादशाहाने ही मागणी अमान्य केली, म्हणून बाजीरावाने मार्च, १७३७

मध्ये दिल्लीवर अचानक स्वारी केली. दिल्लीत मोठी दहशत निर्माण झाली. बादशाहाने मराठ्याना तेरा लाख रुपये खंडणी दिली

**भोपाळची लढाई :** बाजीरावाच्या स्वारीमुळे बादशाह अस्वस्थ झाला. त्याने निजामाला दिल्लीच्या रक्षणासाठी बोलावून घेतले. प्रचंड फौजेनिशी निजाम बाजीरावाविरुद्ध चालून गेला. बाजीरावाने इ स १७३८ मध्ये भोपाळ येथे त्याचा सपूर्ण पराभव केला निजामाने मराठ्यांना माळव्याच्या सुभेदारीची सनद बादशाहाकडून मिळवून देण्याचे मान्य केले

**पोर्तुगिजांचा पराभव** : कोकण प्रात मराठी राज्यात असला तरी त्याच्या किनारपट्टीवरील वसई, ठाणे हे भाग पोर्तुगिजांच्या ताब्यात होते. पोर्तुगीज सत्ताधीश प्रजेवर जुलूम करत बाजीरावाने आपला भाऊ चिमाजीअप्पा यास पोर्तुगिजांचे पारिपत्य करण्यासाठी पाठवले चिमाजीने ठाणे व आसपासचा प्रदेश जिकून घेतला. त्यानतर इ स १७३९ मध्ये त्याने वसईच्या किल्ल्याला वेढा घातला किल्ला अतिशय मजबूत होता पोर्तुगिजाजवळ प्रभावी तोफा होत्या तरीही चिमाजीने चिकाटीने वेढा चालवून पोर्तुगिजाना शरण येण्यास भाग पाडले वसईचा किल्ला व पोर्तुगिजाचा बराच मुलूख मराठ्याच्या ताब्यात आला

वसईचा किल्ला

**बाजीरावाचा मृत्यू :** इ. स १७३९ मध्ये इराणचा बादशाह नादिरशाह याने भारतावर स्वारी केली दिल्लीतून प्रचड सपत्ती लुटून तो परत निघाला. नादिरशाहाच्या आक्रमणाची बातमी मिळताच शाहूच्या आज्ञेने मुघल बादशाहीच्या

रक्षणासाठी बाजीराव मोठी फौज घेऊन उत्तरेला निघाला. तो बऱ्हाणपूरला पोहोचला तोपर्यंत नादिरशाह मायदेशी परत गेला होता. एप्रिल, १७४० मध्ये नर्मदाकाठी रावेरखेडी येथे बाजीरावाचा मृत्यू झाला

बाजीराव हा एक उत्तम सेनानी होता आपल्या पराक्रमाने बाजीरावाने उत्तर भारतात मराठ्याचे वर्चस्व प्रस्थापित केले. त्याने मराठी सत्तेला अखिल भारतीय पातळीवरील एक प्रबळ सत्ता म्हणून स्थान मिळवून दिले.

## स्वाध्याय

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या ·
   (अ) सरदेशमुखी हक्क म्हणजे काय ?
   (आ) पहिल्या बाजीरावाने दिल्लीवर स्वारी का केली ?
   (इ) चिमाजीअप्पाने पोर्तुगिजाचा कोणता मुलूख मराठ्याच्या आधिपत्याखाली आणला ?

२. कसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा :
   (अ) शाहू मुघलाच्या कैदेतून सुटून आल्यावर त्याला ------------ ने विरोध केला (अहिल्याबाई, येसूबाई, ताराबाई)
   (आ) बाजीरावाने आपला भाऊ ------------ यास पोर्तुगिजाचे पारिपत्य करण्यास पाठवले
   (सदाशिवरावभाऊ, विश्वासराव, चिमाजीअप्पा)
   (इ) इ स १७३९ मध्ये इराणचा बादशाह ------------ याने भारतावर स्वारी केली (अहमदशाह, नादिरशाह, तिमूरलग)

३. पुढील प्रश्नाची तीन ते चार वाक्यात उत्तरे द्या
   (अ) आझमशाहाने शाहूची सुटका का केली ?
   (आ) बाळाजी विश्वनाथाची उत्तरेतील कामगिरी सागा.
   (इ) मराठ्याना बादशाहाकडून मिळालेल्या कोणत्या अधिकाराला निजामाचा विरोध होता ? त्याने काय केले ?
   (ई) माळवा व बुंदेलखंडात पहिल्या बाजीरावाने मराठ्याचे वर्चस्व कसे प्रस्थापित केले ?

● ● ●

## २२. पानिपतचे तिसरे युद्ध

बाजीरावानंतर बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब हा पेशवा झाला 'पादशाही रक्षून हिंदुस्थान सर्व आपले करावे' अशी शाहूने नानासाहेबास आज्ञा केली. पेशव्याने तिचे पालन केले.

**उत्तरेकडील राजकारण :** अयोध्येच्या वायव्येला हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या सुपीक प्रदेशात अफगाणिस्तानातून आलेले पठाण स्थायिक झाले होते या पठाणांना रोहिले असे म्हणत रोहिलखंड या नावाने हा प्रदेश ओळखला जातो. गंगा-यमुना नद्यांच्या दोआबाच्या प्रदेशात या रोहिल्यानी धुमाकूळ घातला होता त्यांचा बदोबस्त करण्यासाठी अयोध्येच्या नबाबाने मराठ्यांना पाचारण केले. मराठ्यानी रोहिल्यांचा बंदोबस्त केला.

**अफगाणांशी संघर्ष** · अफगाणिस्तानचा बादशाह अहमदशाह अब्दाली याला भारतातील सपत्तीचे आकर्षण होते पंजाब या संपन्न प्रातावर त्याचा डोळा होता. इ स १७५२ मध्ये त्याने पंजाब जिंकून घेतला आणि आपल्या राज्याला जोडला तेव्हा अब्दालीच्या भीतीने व मुघल राज्यातील वाढत्या अदाधुंदीमुळे अयोध्येचा नबाब सफदरजंग याने मुघल बादशाहातर्फे मराठ्याशी एक करार केला. या करारानुसार मराठ्यांनी रोहिले, जाट, राजपूत, अफगाण इत्यादी अतर्गत व परकीय शत्रूंपासून मुघल सत्तेचे रक्षण करण्याचे मान्य केले त्याच्या बदल्यात मराठ्याना पन्नास लाख रुपये खडणी, त्याचप्रमाणे पजाब, मुलतान, राजपुताना, सिध, रोहिलखंड या भागातून चौथाई वसूल करण्याचा हक्क देण्याचे बादशाहाच्या वतीने अयोध्येचा नबाब सफदरजंग याने कबूल केले.

इ स १७५३ मध्ये नानासाहेब पेशव्याचा भाऊ रघुनाथराव हा जयाप्पा शिंदे व मल्हारराव होळकर याना बरोबर घेऊन उत्तर भारतात मोहिमेवर गेला. या मोहिमेत रघुनाथरावाने भरतपूरचा जाट राजा सूरजमल याच्यावर आक्रमण केले. सूरजमलाच्या कुंभेरी किल्ल्याला वेढा दिला तीस लाख रुपये खडणी वसूल करून त्याने वेढा उठवला वास्तविक पाहता सूरजमल जाट हा मराठ्याचा मित्र होता मराठ्यानी विनाकारण आक्रमण केल्यामुळे सूरजमल दुखावला गेला

राजपुतांच्या अतर्गत कारभारात शिंदे व होळकर यानी हस्तक्षेप केल्यामुळे

राजपूत राजे नाराज झाले. त्यामुळे पुढे इ. स. १७६१ मध्ये जाट व राजपूत यानी मराठ्याना अब्दालीविरुद्ध पानिपतच्या तिसऱ्या युद्धात मदत केली नाही

**अटकेवर मराठ्यांचा ध्वज फडकला** · नजीबखान हा रोहिल्यांचा एक पराक्रमी सरदार होता. उत्तर भारतातील मराठ्यांचे वर्चस्व त्याला सहन होत नव्हते. नजीबखानाच्या सागण्यावरून १७५६ साली अब्दालीने पुन्हा भारतावर स्वारी केली. राजधानी दिल्ली जिकून घेतली व कोट्यवधी रुपयाची लूट घेऊन तो स्वदेशी परत गेला. पेशव्याने रघुनाथराव व मल्हारराव होळकर यांना पुन्हा उत्तरेला रवाना केले. त्यांनी प्रथम दिल्ली हस्तगत केली. यानंतर अब्दालीच्या अधिकाऱ्याना पिटाळून लावून पंजाब जिकला अब्दालीच्या सैनिकांचा पाठलाग करत मराठ्यानी इ. स. १७५८ मध्ये अटकेपर्यंत धडक मारली. अटकेवर मराठ्याचा ध्वज फडकला. अटकेपार पेशावरपर्यत मराठ्यांनी मोहीम काढली; परंतु जिकलेल्या प्रदेशाची नीट व्यवस्था न लावताच रघुनाथराव पुण्याला परतला.

पंजाबवरील पकड घट्ट करण्यासाठी व नजीबखानाचे पारिपत्य करण्यासाठी पेशव्याने दत्ताजी शिंदे व जनकोजी शिदे यांना उत्तरेस पाठवले. दत्ताजी उत्तरेत पोहचला तेव्हा नजीबाने त्याला वाटाघाटीत अडकवून बेसावध ठेवले. मग नजीबाने अब्दालीशी गुप्तपणे संधान साधून त्याला ताबडतोब भारतात मदतीला बोलावले

**दत्ताजीचा मृत्यू** : नजीबाचा संदेश मिळताच अब्दाली पुन्हा भारतावर चालून आला. १० जानेवारी, १७६० रोजी दत्ताजी व अब्दाली यांची यमुनेच्या तीरावर बुराडी घाट येथे गाठ पडली. जोरदार लढाई झाली. दत्ताजीने असामान्य शौर्य गाजवले, परतु या लढाईत त्याला वीरमरण आले

या वेळी विजय मिळवून अब्दाली पूर्वीप्रमाणे आपल्या देशात परत गेला नाही. तो भारतातच थांबला.

**सदाशिवरावभाऊची उत्तरेला रवानगी** : नानासाहेब पेशव्याचा चुलतभाऊ सदाशिवरावभाऊ हा अनुभवी सेनापती व मुत्सद्दी होता. फेब्रुवारी, १७६० मध्ये त्याने निजामाचा उदगीर येथे पराभव केला होता; म्हणूनच दत्ताजीच्या मृत्यूनंतर अब्दालीचे पारिपत्य करण्यासाठी सदाशिवरावभाऊला उत्तरेला पाठवण्यात आले. त्याच्याबरोबर प्रचंड फौज व प्रभावी तोफखाना देण्यात आला. इब्राहिमखान गारदी हा तोफखान्याचा प्रमुख होता. पेशव्याचा थोरला मुलगा विश्वासराव व अनेक

पराक्रमी मराठी सरदार भाऊच्या बरोबर पाठवण्यात आले. परकीय शत्रूचे आक्रमण पूर्णपणे मोडून काढण्याचा मराठ्यांचा निर्धार होता.

**पानिपतचा संग्राम :** २ ऑगस्ट, १७६० रोजी सदाशिवरावभाऊने दिल्ली जिंकून घेतली. या वेळी यमुना नदीच्या पलीकडील तीरावर अब्दालीचा तळ होता

अब्दालीचा काबूलशी संबंध तोडावा या उद्देशाने दिल्लीच्या उत्तरेकडे असलेले कुंजपुरा हे ठाणे भाऊने ताब्यात घेतले याच सुमारास अब्दालीने यमुना पार करून कुंजपुरा व दिल्ली याच्यामधील सोनपत येथे आपला तळ दिला त्यामुळे मराठ्यांचा दिल्लीशी व दक्षिणेशी संबध तुटला भाऊने आपल्या सैन्याचा तळ पानिपतला हालवला. १४ जानेवारी, १७६१ रोजी मराठ्यानी अब्दालीवर हल्ला करून लढाईला सुरुवात केली लढाईत विश्वासरावाला अचानक गोळी लागून तो ठार झाला. हे भाऊला समजताच तो बेभान होऊन शत्रूवर तुटून पडला व युद्धाच्या धुमश्चक्रीत नाहीसा झाला. आपला नेता नाहीसा झालेला पाहून मराठी सैनिकाचा धीर खचला याच वेळी अब्दालीच्या राखीव व ताज्या दमाच्या सैन्याने मराठ्यावर हल्ला चढवला. मराठ्याचा दारुण पराभव झाला.

या पराभवाने मराठ्यांची मोठी हानी झाली. हजारो मराठी सैनिकाची कत्तल झाली. महाराष्ट्रातील एक सबध तरुण पिढी लढाईत मारली गेली अनेक कर्तबगार व पराक्रमी मराठी सरदार धारातीर्थी पडले. तत्कालीन एका पत्रातील वर्णनाप्रमाणे—'दोन मोत्ये गळाली, सत्तावीस मोहरा हरवल्या आणि रुपये, खुर्दा किती गेला याची गणतीच नाही'

या पराभवाने मराठ्यांचे उत्तरेतील वर्चस्व काही काळ नष्ट झाले. या परिस्थितीचा फायदा पुढील काळात इग्रजानी घेतला व भारतात आपले पाय रोवले

**पेशवा माधवराव :** उत्तरेत मराठ्यांची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याचे काम

पेशवा माधवराव

पेशवा माधवराव याने केले. माधवराव हा नानासाहेब पेशव्याचा मुलगा होता माधवरावाला अनेक प्रश्नाना तोड दयावे लागले. त्यापैकी दक्षिणेतील निजाम व हैदरअली याचा विरोध आणि इग्रजी सत्तेचा वाढता प्रभाव हे प्रश्न महत्वाचे होते

**राक्षसभुवनची लढाई** . पानिपतनतर दक्षिणेत निजामाने पुन्हा उचल खाल्ली त्याने मराठी मुलखावर आक्रमण केले माधवरावाने पैठणजवळील राक्षसभुवन येथे इ. स. १७६३ मध्ये निजामाला पराभूत केले.

**हैदरअलीचा बंदोबस्त** : म्हैसूर येथे हैदरअलीने राजाला बाजूला सारून म्हैसूरचे राज्य बळकावले होते. पानिपतवरील मराठ्याच्या पराभवाचा फायदा घेऊन त्याने कर्नाटकातील मराठी प्रदेशावर हल्ले केले. बराच मराठी प्रदेश काबीज केला इ स. १७७१ मध्ये मराठ्यांनी श्रीरंगपट्टणजवळील मोतीतलाव येथील लढाईत हैदराला पराभूत केले हैदरअलीने तुगभद्रा नदीच्या उत्तरेकडील प्रदेश आणि जबर खडणी मराठ्याना देण्याचे मान्य केले.

**मराठी सत्तेच्या वर्चस्वाची पुनर्स्थापना** · पानिपतच्या पराभवामुळे मराठ्याच्या उत्तर भारतातील प्रतिष्ठेला जबर धक्का पोहोचला होता उत्तरेत मराठ्यांची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्यासाठी माधवरावाने महादजी शिदे, तुकोजी होळकर, रामचद्र कानडे व विसाजीपत बिनीवाले या सरदारांना पाठवले मराठी फौजानी जाट, रोहिले व राजपूत याना पराभूत करून वठणीवर आणले. बादशाह शाहआलम यास आपल्या आश्रयाखाली दिल्लीच्या तख्तावर बसवले. अशा रीतीने मराठी सरदारांनी मराठ्यांची प्रतिष्ठा आणि जरब उत्तर भारतात पुन्हा प्रस्थापित केली. यामध्ये महादजी शिदे याचा सिहाचा वाटा होता

इ स १७७२ मध्ये पेशवा माधवराव याचा अकाली मृत्यू झाला या कर्तृत्ववान पेशव्याच्या मृत्यूमुळे मराठी राज्याची मोठी हानी झाली.

**स्वाध्याय**

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे दया :

(अ) रोहिले कोण होते ? ते भारतात कोठे स्थायिक झाले ?

(आ) सूरजमल जाट का दुखावला गेला ?

(इ) पानिपतच्या तिसऱ्या युद्धात राजपुतानी मराठ्याना का मदत केली नाही ?

२. कंसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा .

(अ) इ स १७५२ मध्ये अयोध्येचा नबाब --------- याने मुघल बादशाहातर्फे मराठ्यांशी एक करार केला
(सफदरजंग, नजीबखान, नादिरशाह)

(आ) सदाशिवरावभाऊने निजामाचा ------------- येथे पराभव केला
(उदगीर, पालखेड, हैदराबाद)

३. पुढील प्रश्नाची चार ते पाच वाक्यांत उत्तरे द्या :

(अ) इ स १७५६ च्या मोहिमेत मराठ्यानी उत्तरेत कोणता पराक्रम केला ?

(आ) पानिपतच्या तिसऱ्या युद्धात मराठ्याचा पराभव का झाला ?

(इ) माधवरावाला कोणत्या प्रश्नांना तोंड द्यावे लागले ? त्याने हैदरअलीचा कसा बदोबस्त केला ?

● ● ●

# २३. मराठी सत्तेचे आधारस्तंभ

भारतात मराठी सत्तेचा विस्तार करण्याच्या कामी अनेक मराठी सरदारांनी मोलाची कामगिरी बजावली त्यापैकी काही प्रमुख सरदारांच्या कामगिरीचा आढावा आपण या पाठात घेणार आहोत

मल्हारराव होळकर

**इंदौरचे होळकर** : मल्हारराव हा इंदौरच्या होळकरांच्या सत्तेचा सस्थापक. मल्हाररावाने दीर्घ काळ मराठी राज्याची सेवा केली. गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीत तो निष्णात होता. थोरला बाजीराव व नानासाहेब पेशवा याच्या काळात त्याने उत्तरेत पराक्रम गाजवला. माळव्यात आणि राजपुतान्यात मराठ्याचे वर्चस्व प्रस्थापित करण्यात त्याचा मोठा वाटा होता. पानिपतनंतर उत्तरेतील मराठ्याची प्रतिष्ठा सावरण्यास माधवराव पेशव्यास त्याची फार मदत झाली.

मल्हाररावाच्या निधनानतर त्याची सून अहिल्याबाई हिच्या हाती इदौरच्या कारभाराची सूत्रे आली. तिने सुमारे अठ्ठावीस वर्षे समर्थपणे राज्याचा कारभार करून उत्तरेत मराठी सत्तेची प्रतिमा उंचावली. ती प्रजाहितदक्ष व न्यायी होती. तिने राज्यात शातता व सुव्यवस्था निर्माण करून प्रजेला सुखी केले. इ. स. १७९५ मध्ये तिचे निधन झाले.

अहिल्याबाई होळकर

**नागपूरचे भोसले** : नागपूरचा परसोजी भोसले हा शिवाजीमहाराजांच्या सेवेत होता.

शाहूच्या काळात त्याला वऱ्हाड व गोंडवन या प्रदेशाची सनद देण्यात आली व 'सेनासाहेब-सुभा' हे पदही दिले गेले नागपूरकर भोसल्यांपैकी रघूजी हा सर्वात कर्तबगार व पराक्रमी पुरुष होता. त्याने दक्षिणेतील तिरुचिरापल्ली व अर्काट यांच्या आसपासचा प्रदेश मराठी सत्तेच्या वर्चस्वाखाली आणला. बगाल, बिहार व उडीसा प्राताच्या चौथाईच्या वसुलीचे अधिकार छत्रपती शाहूने रघूजीला दिले होते. उत्तरेत पहिल्या बाजीराव पेशव्याच्या स्वाऱ्या चालू असताना बगाल-बिहारच्या प्रदेशांवर रघूजीच्या मोहिमा स्वतंत्रपणे चालू होत्या. त्याने ते प्रदेश मराठ्यांच्या प्रभावाखाली आणले इ. स १७५५ मध्ये रघूजीचा मृत्यू झाला

रघूजी भोसले

**ग्वालियारचे शिंदे** : थोरल्या बाजीरावाने राणोजी शिदे याचे कर्तृत्व हेरून त्याला उत्तरेत सरदार म्हणून नेमले. त्याने माळव्यामध्ये मराठ्याची सत्ता स्थिर केली. मल्हारराव होळकर आणि उदाजी पवार यांच्या मदतीने त्याने राजस्थानमध्येही मराठ्याचे वर्चस्व प्रस्थापित केले. यानतर माळवा हे शिंद्याचे मुख्य कार्यक्षेत्र बनले व ग्वालियार हे त्याचे मुख्य ठाणे झाले. बाजीरावाच्या उत्तरेकडील मोहिमातही राणोजी सहभागी झाला होता.

राणोजीच्या मृत्यूनंतर जयाप्पा, दत्ताजी व महादजी या त्याच्या मुलांनीही पराक्रम गाजवून उत्तर भारतात मराठी सत्ता प्रबळ केली

जयाप्पा, दत्ताजी व जयाप्पाचा मुलगा जनकोजी यांच्या मृत्यूनंतर थोरल्या माधवराव पेशव्याने शिदे घराण्याची सरदारकी महादजीस दिली. महादजी पराक्रमी आणि मुत्सद्दी होता. पानिपतच्या पराभवानतर उत्तर भारतात मराठ्यांचे वर्चस्व आणि प्रतिष्ठा निर्माण करण्याची कामगिरी त्याने केली. उत्तर भारताच्या सपाट प्रदेशात मराठ्यांची गनिमी काव्याची युद्धपद्धती उपयुक्त ठरणार नाही हे त्याने ओळखले. त्याने फ्रेंच लष्करी तज्ज्ञ डिबॉईन याच्या मार्गदर्शनाखाली आपली फौज

प्रशिक्षित केली व तोफखाना सुसज्ज केला. या प्रशिक्षित फौजेच्या बळावर त्याने रोहिले, जाट, राजपूत, बुंदेले इत्यादींना नमवले. इंग्रजानाही धाकात ठेवले. दिल्लीच्या बादशाहाने त्याला 'वकील-इ-मुत्लक' (बादशाहाचा प्रमुख प्रतिनिधी) हा किताब देऊन त्याचा गौरव केला बादशाहाने त्याच्या हाती बादशाहीचा कारभार सोपवला. कोसळणाऱ्या बादशाहीचा डोलारा सावरणे सोपे काम नव्हते, परंतु अत्यंत प्रतिकूल परिस्थितीवर मात करून महादजीने मोठ्या जिद्दीने इ. स १७८४ ते १७९४ या काळात दिल्लीचा कारभार पाहिला.

महादजी शिंदे

दिल्लीच्या कारभाराची व्यवस्था लावून महादजी पुण्यात आला पेशव्याने खास दरबार भरवून महादजीचा गौरव केला. महादजीने बादशाहाकडून मिळालेला किताब, नजराणे व सनदा पेशव्याला सादर केल्या. इ स १७९४ मध्ये महादजीचा पुण्याजवळ वानवडी येथे मृत्यू झाला

शिंदे, होळकर व भोसले यांच्याप्रमाणे इतरही काही प्रमुख सरदारांनी मराठी राज्याची उल्लेखनीय सेवा केली.

शिवाजीमहाराजांनी उभारलेले आरमार कान्होजी व तुळाजी आंग्रे या पिता-पुत्रांनी प्रबळ बनवले. या प्रबळ आरमाराच्या जोरावर त्यांनी पोर्तुगीज, इंग्रज व सिद्दी या आरमारी सत्तांना धाकात ठेवले व मराठी राज्याच्या किनारपट्टीचे रक्षण केले.

खंडेराव दाभाडे व त्याचा पुत्र त्रिंबकराव यांनी गुजरातमध्ये मराठी सत्तेची पायाभरणी केली. खंडेरावाच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी उमाबाई हिने अहमदाबादच्या मुघल सरदाराचे पारिपत्य केले व तेथील किल्ला जिंकून घेतला. पुढे गायकवाडांनी वडोदरा हे आपले केंद्र बनवून गुजरातमध्ये मराठ्यांचे वर्चस्व स्थापन केले धारच्या पवारांनी शिंदे व होळकर यांना उत्तरेत मराठी सत्तेचा विस्तार करण्यात मोलाचे साहाय्य केले.

थोरल्या माधवराव पेशव्याच्या मृत्यूनंतर मराठी राज्याची घडी विस्कटली होती. ती पेशव्यांचा प्रसिद्ध कारभारी नाना फडणवीस या मुत्सद्द्याने महादजी शिंद्यांच्या

मदतीने व्यवस्थित बसवली. महादजी उत्तर हिंदुस्थानात मराठ्यांचे वर्चस्व स्थापण्यात गुंतलेला असताना नानाने दक्षिणेकडील राजकारणाची सूत्रे सांभाळली.

या कार्यात पटवर्धन, हरिपंत फडके, रास्ते इत्यादी सरदारानी त्याला साथ दिली त्यामुळे मराठी सत्तेचे दक्षिणेत वर्चस्व स्थापन झाले

उत्तर व दक्षिण भारतात मराठी सत्तेचा प्रभाव निर्माण करण्यात मराठे सरदार यशस्वी झाले महादजी शिंदे आणि नाना फडणवीस याच्या मृत्यूनतर मराठी सत्तेला उतरती कळा लागली दुसऱ्या बाजीरावाच्या काळात मराठ्याचा उत्तरेतील व दक्षिणेतील प्रभाव कमी कमी होत गेला आणि मराठ्याची जागा इग्रजानी घेतली. इ. स १८१८ मध्ये इग्रजानी पेशवाईचा शेवट केला. भारतातील सत्ताधीश त्याचे माडलिक झाले. इ. स. १८४८ पर्यंत इग्रजानी सर्व भारत आपल्या आधिपत्याखाली आणला. भारतातील इंग्रजी सत्तेच्या उदयाबरोबरच भारताच्या इतिहासातील मध्ययुग संपले आणि आधुनिक कालखडाला सुरुवात झाली.

**स्वाध्याय**

१. प्रत्येकी एका वाक्यात उत्तरे द्या
   (अ) रघूजी भोसले याने दक्षिणेतील कोणते प्रदेश मराठ्याच्या वर्चस्वाखाली आणले ?
   (आ) नाना फडणवीस याने कोणती कामगिरी केली ?
   (इ) शिवाजीमहाराजानी उभारलेले आरमार कोणी प्रबळ बनवले ?
   (ई) पेशवाईचा शेवट कोणी व केव्हा केला ?

२ कंसात दिलेल्या शब्दातील योग्य शब्द निवडून पुढील विधाने पूर्ण करा ·
   (अ) दिल्लीच्या बादशहाने महादजी शिंदे यास ----------- हा किताब दिला (वजीर, मुतालिक, वकील-इ-मुत्लक)
   (आ) मल्हाररावाच्या मृत्यूनंतर इंदौरच्या कारभाराची सूत्रे ----------- हिच्या हाती आली. (ताराबाई, येसूबाई, अहिल्याबाई)

३. पुढील प्रश्नाची दोन ते तीन वाक्यात उत्तरे द्या :
   (अ) मल्हारराव होळकराच्या कामगिरीविषयी माहिती सागा
   (आ) महादजी शिंदे याने प्रशिक्षित फौज का व कशी उभारली ?
   (इ) उत्तर भारतात मराठी सत्तेचे वर्चस्व आणि प्रतिष्ठा निर्माण करण्याची कामगिरी महादजी शिंदे याने केली, हे विधान स्पष्ट करा.

● ● ●

Table VI Contd..

| Sr. No. | Roll No. | WiA1 | WiA2 | WiB1 | WiB2 | WiC1 | WiC2 | WiD1 | WiD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 21 | 63 | 3 | 4 | 3 | 4 | 5 | 6 | 3 | 5 |
| 22 | 69 | 5 | 5 | 6 | 6 | 6 | 7 | 7 | 8 |
| 23 | 75 | 5 | 5 | 8 | 7 | 4 | 7 | 8 | 11 |
| 24 | 78 | 8 | 13 | 9 | 10 | 10 | 10 | 8 | 12 |
| 25 | 81 | 6 | 7 | 8 | 6 | 8 | 6 | 7 | 9 |
| 26 | 83 | 3 | 5 | 5 | 4 | 6 | 6 | 5 | 5 |
| 27 | 86 | 1 | 3 | 2 | 0 | 2 | 2 | 2 | 3 |
| 28 | 87 | 8 | 10 | 7 | 9 | 9 | 9 | 7 | 11 |
| 29 | 90 | 6 | 7 | 8 | 10 | 10 | 9 | 8 | 10 |
| 30 | 93 | 6 | 6 | 7 | 9 | 8 | 6 | 8 | 10 |
| 31 | 95 | 4 | 4 | 3 | 3 | 6 | 6 | 3 | 5 |
| 32 | 96 | 4 | 6 | 5 | 6 | 7 | 7 | 8 | 8 |
| 33 | 97½ | 4 | 8 | 7 | 7 | 7 | 8 | 9 | 9 |
| 34 | 98 | 5 | 7 | 7 | 7 | 7 | 8 | 9 | 10 |
| 35 | 99 | 11 | 13 | 8 | 10 | 10 | 9 | 8 | 10 |
| 36 | 100 | 7 | 9 | 8 | 8 | 8 | 8 | 10 | 10 |
| 37 | 102 | 6 | 6 | 7 | 7 | 7 | 7 | 10 | 8 |
| 38 | 105 | 1 | 1 | 0 | 0 | 1 | 1 | 0 | 0 |
| 39 | 106 | 6 | 6 | 8 | 8 | 8 | 7 | 9 | 8 |
| 40 | 108 | 6 | 5 | 6 | 5 | 7 | 7 | 9 | 8 |
| 41 | 109 | 2 | 2 | 3 | 3 | 4 | 4 | 3 | 4 |
| 42 | 109B | 15 | 13 | 6 | 6 | 9 | 10 | 10 | 8 |

Contd..

Table VI Contd.

| Sr. No. | Roll No. | WiA1 | WiA2 | WiB1 | WiB2 | WiC1 | WiC2 | WiD1 | WiD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 43 | 144 | 5 | 5 | 7 | 7 | 6 | 6 | 9 | 8 |
| 44 | 166 | 13 | 13 | 9 | 8 | 9 | 9 | 11 | 10 |
| 45 | 180 | 4 | 4 | 5 | 5 | 5 | 6 | 6 | 6 |
| 46 | 181 | 5 | 3 | 4 | 5 | 6 | 6 | 3 | 4 |
| 47 | 213 | 6 | 8 | 7 | 7 | 8 | 9 | 9 | 9 |
| 48 | 214 | 7 | 7 | 9 | 9 | 9 | 10 | 7 | 10 |
| 49 | 225 | 7 | 6 | 5 | 6 | 6 | 6 | 7 | 8 |
| 50 | 227 | 5 | 4 | 4 | 4 | 5 | 4 | 5 | 5 |
| 51 | 229 | 2 | 5 | 2 | 4 | 6 | 6 | 3 | 6 |
| 52 | 232 | 5 | 5 | 6 | 7 | 6 | 7 | 5 | 9 |
| 53 | 233 | 4 | 4 | 6 | 7 | 6 | 7 | 8 | 8 |
| 54 | 235 | 7 | 8 | 8 | 7 | 6 | 7 | 8 | 10 |
| 55 | 239 | 10 | 10 | 6 | 9 | 10 | 10 | 10 | 11 |
| 56 | 243 | 6 | 5 | 6 | 8 | 8 | 8 | 9 | 8 |
| 57 | 245 | 8 | 5 | 6 | 8 | 6 | 7 | 8 | 8 |
| 58 | 249 | 3 | 3 | 3 | 7 | 5 | 4 | 3 | 5 |
| 59 | 252 | 4 | 3 | 6 | 6 | 6 | 7 | 8 | 6 |
| 60 | 255 | 7 | 7 | 8 | 9 | 8 | 7 | 9 | 10 |
| 61 | 256 | 5 | 3 | 5 | 5 | 5 | 6 | 5 | 8 |
| 62 | 257 | 7 | 8 | 8 | 6 | 7 | 8 | 7 | 8 |

contd...

Table VI Contd...

| Sr. No. | Roll No. | WiA1 | WiA2 | WiB1 | WiB2 | WiC1 | WiC2 | WiD1 | WiD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 63 | 258 | 7 | 6 | 7 | 6 | 7 | 8 | 9 | 8 |
| 64 | 309 | 7 | 7 | 10 | 8 | 8 | 10 | 8 | 10 |
| 65 | 314 | 8 | 11 | 9 | 8 | 10 | 11 | 6 | 13 |
| 66 | 318 | 4 | 5 | 6 | 6 | 6 | 6 | 6 | 9 |
| 67 | 371 | 4 | 4 | 6 | 4 | 6 | 6 | 6 | 8 |
| 68 | 372 | 8 | 6 | 8 | 8 | 9 | 10 | 11 | 9 |
| 69 | 384 | 7 | 7 | 7 | 8 | 8 | 8 | 8 | 11 |
| 70 | 392 | 3 | 2 | 2 | 2 | 2 | 4 | 3 | 3 |
| 71 | 394 | 10 | 8 | 10 | 9 | 8 | 9 | 10 | 11 |
| 72 | 401 | 6 | 5 | 4 | 5 | 6 | 7 | 6 | 5 |
| 73 | 402 | 6 | 7 | 9 | 9 | 8 | 10 | 9 | 10 |
| 74 | 404 | 6 | 6 | 6 | 5 | 7 | 8 | 8 | 9 |
| 75 | 413 | 3 | 3 | 5 | 5 | 5 | 6 | 9 | 8 |
| 76 | 545 | 4 | 5 | 6 | 7 | 6 | 8 | 6 | 8 |
| 77 | 575 | 5 | 5 | 4 | 5 | 4 | 7 | 3 | 4 |
| 78 | 595 | 5 | 6 | 8 | 7 | 7 | 9 | 8 | 8 |
| 79 | 639 | 4 | 4 | 6 | 4 | 7 | 6 | 7 | 3 |
| 80 | 644 | 4 | 3 | 2 | 3 | 3 | 4 | 4 | 3 |
| 81 | 659 | 4 | 5 | 6 | 6 | 7 | 8 | 7 | 8 |
| 82 | 666 | 2 | 3 | 1 | 1 | 2 | 2 | 0 | 2 |
| 83 | 738 | 5 | 5 | 6 | 5 | 6 | 7 | 6 | 6 |

TABLE VII

Matrix of assessment of well defined essays with marking scheme

| Sr. No. | Roll No. | WJA1 | WJA2 | WJB1 | WJB2 | WJC1 | WJC2 | WJD1 | WJD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 6 | 7 | 7 | 11 | 8 | 10 | 11 | 10 | 9 |
| 2 | 9 | 13 | 8 | 11 | 8 | 11 | 11 | 11 | 10 |
| 3 | 15 | 5 | 2 | 1 | 1 | 3 | 5 | 3 | 2 |
| 4 | 19 | 9 | 9 | 10 | 9 | 14 | 14 | 12 | 12 |
| 5 | 22 | 7 | 6 | 4 | 2 | 9 | 8 | 6 | 4 |
| 6 | 27 | 8 | 8 | 7 | 8 | 11 | 8 | 9 | 8 |
| 7 | 30 | 8 | 6 | 8 | 6 | 10 | 12 | 10 | 11 |
| 8 | 33 | 7 | 8 | 4 | 2 | 5 | 7 | 5 | 4 |
| 9 | 35 | 9 | 7 | 10 | 9 | 12 | 13 | 10 | 10 |
| 10 | 37 | 8 | 7 | 7 | 6 | 9 | 10 | 6 | 6 |
| 11 | 41 | 10 | 7 | 7 | 9 | 11 | 11 | 10 | 9 |
| 12 | 42 | 11 | 8 | 9 | 8 | 12 | 13 | 13 | 11 |
| 13 | 44 | 9 | 6 | 7 | 6 | 9 | 9 | 7 | 6 |
| 14 | 49 | 9 | 7 | 5 | 7 | 12 | 10 | 9 | 9 |
| 15 | 55 | 6 | 9 | 7 | 7 | 10 | 11 | 10 | 11 |
| 16 | 56 | 14 | 9 | 9 | 8 | 13 | 13 | 12 | 11 |
| 17 | 57 | 6 | 4 | 8 | 8 | 13 | 11 | 11 | 9 |
| 18 | 60 | 3 | 1 | 0 | 1 | 1 | 2 | 1 | 1 |
| 19 | 61 | 7 | 4 | 6 | 4 | 11 | 9 | 7 | 7 |
| 20 | 62 | 9 | 8 | 8 | 5 | 9 | 9 | 7 | 5 |
| 21 | 63 | 7 | 7 | 5 | 4 | 8 | 8 | 5 | 4 |

contd..

Table VII Contd...

| Sr. No. | Roll No. | WJA1 | WJA2 | WJB1 | WJB2 | WJC1 | WJC2 | WJD1 | WJD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 22 | 69 | 8 | 6 | 6 | 5 | 12 | 8 | 7 | 6 |
| 23 | 75 | 10 | 9 | 9 | 7 | 9 | 10 | 11 | 9 |
| 24 | 78 | 10 | 9 | 10 | 8 | 12 | 12 | 12 | 12 |
| 25 | 81 | 10 | 9 | 8 | 7 | 11 | 10 | 9 | 10 |
| 26 | 83 | 8 | 8 | 4 | 4 | 7 | 9 | 4 | 4 |
| 27 | 86 | 7 | 6 | 4 | 3 | 6 | 6 | 2 | 3 |
| 28 | 87 | 11 | 9 | 7 | 7 | 9 | 11 | 10 | 10 |
| 29 | 90 | 13 | 9 | 8 | 7 | 13 | 11 | 11 | 9 |
| 30 | 93 | 12 | 9 | 8 | 6 | 11 | 9 | 10 | 10 |
| 31 | 95 | 8 | 6 | 4 | 2 | 7 | 6 | 5 | 3 |
| 32 | 96 | 7 | 4 | 6 | 4 | 7 | 11 | 8 | 6 |
| 33 | 97 | 9 | 8 | 7 | 6 | 12 | 11 | 10 | 9 |
| 34 | 98 | 11 | 9 | 9 | 6 | 12 | 9 | 10 | 10 |
| 35 | 99 | 15 | 10 | 7 | 8 | 11 | 10 | 8 | 9 |
| 36 | 100 | 13 | 13 | 9 | 6 | 14 | 10 | 10 | 9 |
| 37 | 102 | 11 | 10 | 9 | 6 | 11 | 11 | 9 | 6 |
| 38 | 105 | 4 | 0 | 0 | 0 | 2 | 1 | 1 | 1 |
| 39 | 106 | 9 | 7 | 6 | 5 | 10 | 9 | 8 | 6 |
| 40 | 108 | 10 | 7 | 6 | 4 | 11 | 10 | 10 | 6 |
| 41 | 109 | 8 | 7 | 5 | 3 | 6 | 8 | 6 | 3 |
| 42 | 109B | 11 | 13 | 6 | 5 | 13 | 9 | 11 | 8 |

contd....

Table VlI Contd..

| Sr. No. | Roll No. | WJA1 | WJA2 | WJB1 | WJB2 | WJC1 | WJC2 | WJD1 | WJD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 43 | 144 | 8 | 9 | 9 | 7 | 13 | 8 | 11 | 6 |
| 44 | 166 | 10 | 11 | 9 | 7 | 14 | 12 | 12 | 10 |
| 45 | 180 | 7 | 7 | 6 | 5 | 10 | 8 | 6 | 5 |
| 46 | 181 | 8 | 7 | 5 | 4 | 11 | 8 | 5 | 4 |
| 47 | 213 | 12 | 8 | 8 | 8 | 11 | 10 | 9 | 8 |
| 48 | 214 | 9 | 9 | 7 | 7 | 13 | 12 | 10 | 10 |
| 49 | 225 | 6 | 5 | 8 | 4 | 9 | 8 | 6 | 6 |
| 50 | 227 | 6 | 6 | 5 | 3 | 8 | 8 | 6 | 5 |
| 51 | 229 | 6 | 6 | 5 | 4 | 9 | 8 | 6 | 6 |
| 52 | 232 | 4 | 7 | 6 | 6 | 9 | 10 | 7 | 6 |
| 53 | 233 | 7 | 6 | 6 | 4 | 12 | 9 | 6 | 5 |
| 54 | 235 | 13 | 11 | 9 | 7 | 12 | 13 | 12 | 10 |
| 55 | 239 | 11 | 10 | 9 | 8 | 12 | 11 | 11 | 10 |
| 56 | 243 | 9 | 9 | 8 | 4 | 9 | 8 | 8 | 6 |
| 57 | 245 | 11 | 9 | 8 | 3 | 9 | 8 | 7 | 5 |
| 58 | 249 | 5 | 5 | 4 | 3 | 8 | 7 | 4 | 3 |
| 59 | 250 | 7 | 6 | 6 | 5 | 10 | 7 | 8 | 4 |
| 60 | 255 | 11 | 9 | 7 | 5 | 10 | 7 | 11 | 11 |
| 61 | 256 | 11 | 8 | 7 | 6 | 9 | 10 | 9 | 7 |
| 62 | 257 | 7 | 6 | 8 | 6 | 9 | 11 | 9 | 8 |
| 63 | 258 | 11 | 8 | 7 | 5 | 12 | 10 | 8 | 7 |

Contd.....

Table VII Contd..

| Sr. No. | Roll No. | WJA1 | WJA2 | WJB1 | WJB2 | WJC1 | WJC2 | WJD1 | WJD2 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 64 | 309 | 8 | 9 | 9 | 7 | 12 | 11 | 10 | 10 |
| 65 | 314 | 7 | 8 | 7 | 7 | 13 | 12 | 12 | 12 |
| 66 | 318 | 6 | 6 | 7 | 6 | 8 | 9 | 6 | 9 |
| 67 | 371 | 8 | 6 | 7 | 5 | 8 | 9 | 9 | 6 |
| 68 | 372 | 13 | 11 | 9 | 8 | 14 | 13 | 10 | 9 |
| 69 | 384 | 7 | 6 | 9 | 6 | 12 | 11 | 11 | 9 |
| 70 | 392 | 6 | 7 | 2 | 2 | 4 | 6 | 3 | 3 |
| 71 | 394 | 9 | 6 | 9 | 7 | 12 | 11 | 10 | 11 |
| 72 | 401 | 7 | 6 | 7 | 5 | 10 | 10 | 6 | 4 |
| 73 | 402 | 7 | 7 | 10 | 7 | 14 | 13 | 9 | 11 |
| 74 | 404 | 7 | 7 | 6 | 6 | 9 | 9 | 6 | 7 |
| 75 | 413 | 8 | 9 | 5 | 4 | 10 | 8 | 8 | 6 |
| 76 | 545 | 10 | 7 | 4 | 7 | 10 | 9 | 8 | 5 |
| 77 | 575 | 6 | 5 | 4 | 7 | 10 | 7 | 5 | 5 |
| 78 | 595 | 9 | 6 | 6 | 5 | 9 | 9 | 8 | 9 |
| 79 | 639 | 10 | 7 | 5 | 5 | 9 | 10 | 6 | 5 |
| 80 | 644 | 9 | 4 | 4 | 2 | 8 | 4 | 5 | 3 |
| 81 | 659 | 9 | 7 | 6 | 4 | 10 | 9 | 8 | 6 |
| 82 | 666 | 6 | 7 | 6 | 4 | 10 | 9 | 8 | 6 |
| 83 | 738 | 9 | 7 | 7 | 7 | 12 | 8 | 5 | 6 |

# BIBLIOGRAPHY


| | | |
|---|---|---|
| 1. | Fisher R.A. | Statistical Methods for research Workers Oliver and Boyd; Edinburg Tweeddole Court, London. |
| 2. | Garrett H.E. Ph/D. | Statistics in Psychology and Education : Alied Pacific Private Limited, Bombay. |
| 3. | Gayen A.K. Pandya P.B. Magur R.K. Duari P. Dubey S.D. Bhattacharya N. | Report No. 1 of the Resdarch Project on Examinations Sponsored by Ministry of Education, Government of India, New Delhi. |
| 4. | Guilford J.P. | Fundamental Statistics in Psychology and Education McGraw-Hill Book Company INC, New York, Toronto, London. |
| 5. | Guilford J.P. | Psychometric Methods McGraw-Hill Book Company, INC, New York Toronto, London. |
| 6. | Person, E.S. and Hartly H.O. | Biometrica Tables for Statisticians Volume I Cambridge University Press, London. |
| 7. | Maxwell A.E. | Analysing Quantitative Data : Dondon : Methuen & Co., New York John Wiley & Sons., Inc. |